॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अथ द्वादशोऽध्यायः

## अवतरणिका

*श्रीभगवंतांनी चौथ्या अध्यायाच्या तेहतीसाव्या आणि चौतीसाव्या श्लोकांत ज्ञानयोगाची श्रेष्ठता सांगून ज्ञान प्राप्त करून घेण्याविषयी प्रेरणा केली. नंतर ज्ञानाच्या माहात्म्याचे वर्णन केले. त्यानंतर पाचव्या अध्यायाच्या सोळाव्या, सतराव्या आणि चोवीसाव्यापासून सव्वीसाव्या श्लोकापर्यंत, सहाव्या अध्यायाच्या चोवीसाव्यापासून अठ्ठावीसाव्या श्लोकापर्यंत आणि आठव्या अध्यायाच्या अकराव्यापासून तेराव्या श्लोकापर्यंत निर्गुण-निराकाराच्या उपासनेचे महत्त्व सांगितले.*

*सहाव्या अध्यायाच्या सत्तेचाळीसाव्या श्लोकात साधक भक्ताचा महिमा वर्णन केला आणि सातव्या अध्याया-पासून अकराव्या अध्यायापर्यंत अनेक ठिकाणी "**अहम्**", "**माम्**" इत्यादी पदांनी विशेषरूपाने सगुण-साकार तसेच सगुण-निराकाराच्या उपासनेचे महत्त्व सांगितले तसेच शेवटी अकराव्या अध्यायाच्या चौपन्नाव्या-पंचावन्नाव्या श्लोकांत अनन्यभक्तीचे माहात्म्य तसेच त्याच्या फलासहित स्वरूपाचे वर्णन केले*.*

*उपर्युक्त वर्णनाने अर्जुनाच्या मनात ही जिज्ञासा उत्पन्न झाली की, सगुण भगवंताची उपासना करणारे आणि निर्गुण ब्रह्माची उपासना करणारे ह्यापैकी कोणता उपासक श्रेष्ठ आहे. याच जिज्ञासेने अर्जुन प्रश्न करत आहेत.*

*अर्जुन उवाच*

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥**

**ये** = जे
**भक्ताः** = भक्त
**एवम्** = अशाप्रकारे (अकराव्या अध्यायाच्या पंच्चावन्नाव्या श्लोकानुसार)
**सततयुक्ताः** = निरंतर आपल्याच चिंतनात राहून
**त्वाम्** = आपली (सगुण-साकाराची)
**पर्युपासते** = उपासना करतात
**च** = आणि
**ये** = जे
**अक्षरम्** = अविनाशी
**अव्यक्तम्,** = निर्गुण
**अपि** निराकाराचीच (उपासना करतात)
**तेषाम्** = त्यां दोन्हीपैकी
**योगवित्तमाः** = उत्तम योगवेत्ता
**के** = कोण आहे?

---

* या अध्यायाच्या पूर्वी साकार भगवंताच्या उपासकांचे वर्णन ज्या श्लोकांमध्ये व ज्या पदांनी केले आहे त्यांचा परिचय पुढील प्रमाणे आहे.

| अध्याय | श्लोक | पद | अर्थ |
|---|---|---|---|
| ६ | ४७ | "मद्गतेनान्तरात्मना--श्रद्धावान्भजते यो माम्" | जो श्रद्धावान् भक्त माझ्यात तल्लीन होऊन मनाने माझे भजन करतो. |
| ७ | १ | "मय्यासक्तमनाः--------योगं युञ्जन्मदाश्रयः" | माझ्यात अनन्यप्रेमाने आसक्त मनाचा आणि माझ्या आश्रित होऊन भक्तियोगात लागलेला. |
| ७ | २९-३० | "मामाश्रित्य यतन्ति", "युक्त चेतसः" | युक्तचित्ताचे पुरुष मला शरण होऊन साधन करतात. |
| ८ | ७ | "मय्यर्पितमनोबुद्धिः" | मन-बुद्धी माझ्यात अर्पित केलेला. |
| ८ | १४ | "अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः" | माझ्यात अनन्यचित्त होऊन जो नेहमी माझे स्मरण करतो. |
| ९ | १४ | "सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः" | दृढनिश्चयी भक्तजन निरंतर माझ्या नाम, गुणांचे कीर्तन करत माझ्या प्राप्तीसाठी प्रयत्न करतात. |
| ९ | २२ | "अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते" | जे भक्तजन अनन्यभावाने माझे चिंतन करत उपासना करतात. |
| ९ | ३० | "भजते मामनन्यभाक्" | अनन्यभावाने माझे भजन करतो. |

*व्याख्या*— **एवं सततयुक्ता ये भक्ताः**—अकराव्या अध्यायाच्या पंचावन्नाव्या श्लोकात भगवंतांनी "**यः**" आणि "**सः**" पद ज्या साधकासाठी प्रयुक्त केले आहे, त्याच साधकासाठी अर्थात् सगुण-साकार भगवंताची उपासना करणाऱ्या सर्व साधकांसाठी येथे "**ये भक्ताः**" पद आले आहे.

येथे "**एवम्**" पदाने अकराव्या अध्यायाच्या पंचावन्नाव्या श्लोकाचा निर्देश केला गेला आहे. "मी भगवंताचाच आहे" अशा प्रकारे भगवंताचाच होऊन राहणेच "सततयुक्त" होणे आहे.

भगवंताविषयी पूर्ण श्रद्धा ठेवणाऱ्या साधक भक्तांचा एकमात्र उद्देश भगवत्प्राप्ती असतो. म्हणून प्रत्येक (पारमार्थिक-भगवत्संबंधी जप ध्यानादी अथवा व्यावहारिक, शारीरिक आणि आजीविका-संबंधी) क्रियेत त्यांचा संबंध नित्य-निरंतर भगवंताशी कायम राहतो. "**सततयुक्ताः**" पद अशाच साधक भक्तांचा वाचक आहे.

साधकाकडून ही एक फार मोठी चूक होत असते की, तो पारमार्थिक क्रिया करताना तर आपला संबंध भगवंताशी मानतो परंतु व्यावहारिक क्रिया करताना तो आपला संबंध संसाराशी मानतो. या चुकीचे कारण, वेळोवेळी साधकाच्या उद्देशात होणारा बदल, हे असते. जोपर्यंत बुद्धीत धनप्राप्ती, कुटुंबपालन इत्यादी वेगवेगळे उद्देश कायम असतात, तोपर्यंत साधकाचा संबंध निरंतर भगवंताशी राहत नाही. जर त्याने आपल्या जीवनाचा एकमात्र उद्देश भगवत्प्राप्तीला योग्य प्रकारे ओळखले तर, त्याची प्रत्येक क्रिया भगवत्प्राप्तीचे साधन होऊन जाईल. भगवत्प्राप्तीचा उद्देश झाल्यावर भगवंताचा जप-स्मरण-ध्यानादी करते वेळी तर त्याचा संबंध भगवंताशी आहेच परंतु व्यावहारिक क्रिया करते वेळीही तो नित्य-निरंतर भगवंतात लागलेलाच आहे असे समजावे.

जर क्रियेच्या आरंभी आणि शेवटी साधकाला भगवत्स्मृती असेल तर, क्रिया करते वेळीही त्याची निरंतर संबंधात्मक स्मृती कायम राहत असते—असे मानले पाहिजे. जसे वहीखात्यात हिशोब मिळवताना व्यापाऱ्याची वृत्ती इतकी तल्लीन असते की, मी कोण आहे आणि काय करत आहे, याचे भान त्यावेळी त्याला नसते. केवळ हिशोबातील आकड्याकडेच त्याचे लक्ष असते. हिशोब सुरू करण्यापूर्वी त्याला "मी अमुक व्यापारी आहे, मी हिशोब करीत आहे" अशी धारणा असते आणि हिशोब संपताच पुन्हा त्याला त्याच भावाची स्फुरणा होत असते की, "मी अमुक व्यापारी आहे आणि अमुक कार्य करत होतो." म्हणून ज्यावेळी तो तल्लीन होऊन हिशोब करत होता, त्या वेळीही त्याला "मी अमुक व्यापारी आहे आणि अमुक काम करत आहे" या भावाची विस्मृती दिसत असली तरीही, ती "विस्मृती" मानली जात नाही.

त्याचप्रमाणे, जर कर्तव्यकर्माच्या आरंभी आणि शेवटी साधकाचा हा भाव असेल की "मी भगवंताचाच आहे आणि भगवंतासाठीच कर्तव्यकर्म करत आहे" तसेच या भावात त्याला थोडीही शंका नसेल, तर जेव्हा तो आपल्या कर्तव्यकर्मामध्ये तल्लीन असतो, त्यावेळी त्याला भगवंताची विस्मृती दिसत असली तरीही, ती विस्मृती वास्तविक मानली जात नाही.

**त्वाम् पर्युपासते**—येथे "**त्वाम्**" पदाने त्या सर्व सगुण-साकार स्वरूपांना गृहीत धरले पाहिजे, ज्यांना भगवान् भक्तांच्या इच्छेनुसार वेळोवेळी धारण करतात आणि जे स्वरूप भगवंतांनी वेगवेगळ्या अवतारात धारण केले आहे. तसेच भगवंताचे जे स्वरूप दिव्य धामात विद्यमान आहे,

| | | | |
|---|---|---|---|
| १० | ९ | "मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परः स्मरम्" | माझ्यात मन लावून मला प्राण अर्पण करणारे भक्तजन परस्पर माझा प्रभाव जाणतात. |
| ११ | ५५ | "मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः" | माझ्यासाठीच संपूर्ण कर्म करणारा, मत्परायण आणि माझा भक्त आहे. |
| या अध्यायाच्या पूर्वी निराकार उपासकांचे वर्णन ज्या श्लोकांत ज्या पदाने केले आहे त्याचा परिचय पुढील प्रमाणे आहे. | | | |
| ४ | ३४ | "तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया" | (ते ज्ञान तू तत्त्वदर्शी ज्ञान्याकडे जाऊन समजून घे, त्यांना साष्टांग दंडवत प्रणाम केल्याने, त्यांची सेवा केल्याने आणि सरळतेने प्रश्न करण्याने.) |
| ४ | ३९ | "श्रद्धावाँल्लभते ज्ञानम्" | श्रद्धावान पुरुषाला ज्ञान प्राप्त होते. |
| ५ | ८ | "नैव किञ्चित्करोमीती युक्तो मन्येत तत्त्ववित्" | तत्वज्ञ सांख्ययोग्याने असे समजावे की, मी काहीच करीत नाही. |
| ५ | १३ | "नैव कुर्वन्न कारयन्" | कर्म न करता किंवा न करविता. |
| ५ | २४-२६ | "ब्रह्मनिर्वाणम्" | निर्वाणब्रह्माला प्राप्त होतो. |
| ६ | २५ | "आत्मसंस्थं मनः कृत्वा" | मनाला परमात्म्यात स्थित करून. |
| ८ | ११ | "यदक्षरं वेदविदो वदन्ति" | वेदांचे ज्ञाते पुरुष ज्या परमपदाला "अक्षर" म्हणतात. |
| ८ | १३ | "ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्" | ॐ ह्या एक अक्षररूपी ब्रह्माचे उच्चारण आणि माझे निर्गुण ब्रह्माचे स्मरण करत. |
| ९ | १५ | "ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते" | ज्ञानयोगी माझे निर्गुण ब्रह्माचे ज्ञानयज्ञाद्वारा पूजन करीत माझी उपासना करतात. |

ज्याला भक्तलोक आपल्या मान्यतेप्रमाणे अनेक रूपांनी आणि नामांनी संबोधतात.

**पर्युपासते**—पदाचा अर्थ आहे **"परितः उपासते"** अर्थात् उत्तम प्रकारे उपासना करतात. जसे पतिव्रता स्त्री कधी पतीच्या सेवेत आपल्या शरीराला अर्पण करून, कधी पतीच्या अनुपस्थितीत पतीचे चिंतन करून, कधी पतीच्या संबंधाने सासू-सासरे इत्यादींची सेवा करून आणि कधी पतीसाठी स्वयंपाक करणे इत्यादी घरगुती कार्य करून सदा सर्वदा पतीचीच उपासना करत असते. तसेच साधक भक्तही कधी भगवंतात तल्लीन होऊन, कधी भगवंताचा जप-स्मरण-चिंतन करून, कधी सांसारिक प्राण्यांना भगवंताचेच मानून त्यांची सेवा करून आणि कधी भगवंताच्या आज्ञेनुसार सांसारिक कर्मांना करत असताना सदा-सर्वदा भगवंताच्या उपासनेतच व्यस्त राहत असतो. अशी उपासनाच उत्कृष्ट समजली गेली आहे. अशा उपासकाच्या अंतःकरणात उत्पत्ति-विनाशशील पदार्थ आणि क्रिया यांचे मुळीच महत्त्व नसते

**ये चाप्यक्षरमव्यक्तम्**—येथे **"ये"** पद निर्गुण निराकाराची उपासना करणाऱ्या साधकांचे वाचक आहे. अर्जुनाने श्लोकाच्या पूर्वार्धात, ज्या श्रेणीच्या सगुण-साकाराच्या उपासकासाठी **"ये"** पदाचा प्रयोग केला आहे, त्याच श्रेणीच्या निर्गुण-निराकाराच्या उपासकांसाठी येथे **"ये"** पदाचा प्रयोग केला गेला आहे.

**अक्षरम्**—हे पद अविनाशी सच्चिदानंदघन परब्रह्माचे वाचक आहे (याची व्याख्या याच अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात केली जाईल)

जो कोणत्या इन्द्रियांचा विषय नाही, त्याला **'अव्यक्त'** म्हणतात. येथे **'अव्यक्तम्'** पदाबरोबर **'अक्षरम्'** हे विशेषण दिले गेले आहे. म्हणून हे पद निर्गुण-निराकार ब्रह्माचे वाचक आहे (ह्याची व्याख्या ह्याच अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात केली जाईल).

**अपि**—या पदातून असा भाव प्रतीत होतो की, येथे साकार उपासकांची तुलना अशा निराकार उपासकांशी केली गेली आहे, जे केवळ निराकार ब्रह्माला श्रेष्ठ मानून त्याची उपासना करतात.

**तेषां के योगवित्तमाः**—येथे **"तेषाम्"** पद सगुण आणि निर्गुण दोन्ही प्रकारच्या उपासकांसाठी आले आहे. याच अध्यायाच्या पाचव्या श्लोकात **"तेषाम्"** पद निर्गुण उपासकांसाठी आले आहे, परंतु सातव्या श्लोकात **"तेषाम्"** पद सगुण उपासकांसाठी आले आहे.

या पदातून अर्जुनाचा असा अभिप्राय आहे की, या दोन प्रकारच्या उपासकांपैकी कोणता उपासक श्रेष्ठ आहे?

साकार आणि निराकाराच्या उपासकांत श्रेष्ठ कोण आहे? अर्जुनाच्या या प्रश्नाचे उत्तर भगवंतांनी जे दिले आहे, त्यावर सखोल विचार केल्यास अर्जुनाचा हा प्रश्न किती महत्त्वाचा आहे हे समजून येते. जसे—

या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकापासून चौदाव्या अध्यायाच्या वीसाव्या श्लोकापर्यंत, भगवंत अविराम बोलतच गेले आहेत. त्र्याहत्तर श्लोकांचे एवढे दीर्घ प्रकरण गीतेत एकमात्र हेच आहे. यावरुन स्पष्ट होते की, भगवान् या प्रकरणात काही तरी महत्त्वाचा विषय समजावू इच्छितात. साधकांना साकार आणि निराकार स्वरूपाच्या एकतेचा बोध व्हावा, त्यांच्या अंतःकरणात या दोन्ही स्वरूपांना प्राप्त करविणाऱ्या साधनांचे सांगोपांग रहस्य प्रगट व्हावे, सिद्ध भक्त (१२।१३-१९) आणि ज्ञानी (१४।२२-२५) यांच्या आदर्श लक्षणांचे त्याना ज्ञान व्हावे आणि संसाराशी संबंध-विच्छेदाचे विशेष महत्त्व त्यांच्या लक्षात यावे,—याच उद्देशांना सिद्ध करण्यात भगवंताची विशेष आवड दिसत आहे. तात्पर्य, भगवंताच्या अंतःकरणात जीवासाठी जे परम कल्याणकारी, अत्यंत गोपनीय आणि उत्तमोत्तम भाव होते, त्यांना प्रगट करविण्याचे श्रेय अर्जुनाच्या या भगवत्प्रेरित प्रश्नालाच आहे.

**परिशिष्ट भाव**—'योगशास्त्र' असल्यामुळे गीतेत 'योग' मुख्य आहे. म्हणून वास्तविक योगवेत्ता कोण आहे?—हा अर्जुनाचा प्रश्न आहे. योगवेत्त्यांच्या तीन श्रेणी आहेत. (१)योगवित् अर्थात योगी (२) योगवित्तर अर्थात् दोन योग्यात श्रेष्ठ योगी आणि (३) योगवित्तम अर्थात् संपूर्ण योग्यात श्रेष्ठ योगी. अर्जुनाला 'योगवित्' आणि 'योगवित्तर' यांच्या विषयात संदेह नाही, तर 'योगवित्तम' च्या विषयात संदेह आहे.

*संबंध—अर्जुनाच्या सगुण आणि निर्गुण उपासकांची श्रेष्ठता विषयक प्रश्नाच्या उत्तरात भगवान् निर्णय देतात.*

*श्रीभगवानुवाच*

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः॥ २॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मयि** | = माझ्यात | **ये** | = जे भक्त | **उपासते** | = उपासना करतात, |
| **मनः** | = मनाला | **परया** | = परम | **ते** | = ते |
| **आवेश्य** | = स्थित करून | **श्रद्धया** | = श्रद्धेने | **मे** | = माझ्या |
| **नित्ययुक्ताः** | = नित्य-निरंतर माझ्यातच मग्न झालेले | **उपेताः** | = युक्त होऊन | **मताः** | = मताने |
| | | **माम्** | = माझी (सगुण-साकाराची) | **युक्ततमाः** | = सर्वश्रेष्ठ योगी आहेत. |

***व्याख्या*—**[ भगवंतांनी नेमका हाच निर्णय अर्जुनाचा प्रश्न नसतानाही, पूर्वी सहाव्या अध्यायाच्या सत्तेचाळीसाव्या श्लोकात दिला होता. परंतु त्यावेळी त्या विषयात आपला प्रश्न नसल्याने त्या निर्णयाला अर्जुन पकडू शकले नाहीत. कारण स्वतःचा प्रश्न नसताना ऐकलेली गोष्टही बहुतेक लक्षात येत नाही. म्हणून त्यांनी या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात असा प्रश्न केला.

त्याचप्रमाणे आपल्या मनातील एखाद्या विषयाला जाणून घेण्याची पूर्ण अभिलाषा आणि उत्कंठा ह्याच्या अभावात, तसेच आपला प्रश्न नसल्याकारणाने सत्संगात ऐकलेल्या आणि शास्त्रात वाचलेल्या साधनासंबंधी मार्मिक आणि महत्त्वाच्या गोष्टी बहुतेक साधकाच्या लक्षात येत नाहीत. जर तीच गोष्ट त्यांच्या प्रश्नाच्या उत्तरात समजून सांगितली गेली, तर ती गोष्ट आपल्यासाठी विशेषत्वाने सांगितली गेली आहे असे वाटून श्रद्धेने तो ग्रहण करत असतो. प्रायः साधक ऐकलेल्या आणि वाचलेल्या गोष्टींना आपल्यासाठी न समजता त्यांची उपेक्षा करतात, परंतु असे असले तरीही त्यांच्यात त्या गोष्टींचे संस्कार सामान्यरूपाने राहतातच, जे विशेष उत्कंठा निर्माण झाल्यास जागृतही होऊ शकतात. म्हणून साधकांनी त्यांनी जे काही ऐकले किंवा वाचले असेल, त्याला आपल्यासाठीच सांगितले आहे, असे समजून आपल्या जीवनात प्रत्यक्ष उतरविण्याचा प्रयत्न करावा. ]

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते**—मन तिथेच ओढ घेते, जेथे प्रेम असते. ज्याच्याविषयी प्रेम असते, त्याचेच चिंतन होत असते.

''**नित्ययुक्ताः**'' चे तात्पर्य, साधकाने स्वतः भगवंतात लागावे हे आहे—''भगवंतच माझे आहेत आणि मी भगवंताचाच आहे'' हेच स्वतःचे भगवंतात लागणे आहे. भगत्प्राप्ती हा स्वतःचा दृढ उद्देश झाल्यास मन-बुद्धी आपोआप भगवंताकडे धाव घेतात. या उलट स्वतःचा उद्देश भगवत्प्राप्ती नसेल, तर मन-बुद्धीला भगवंताकडे वळविण्याचा कितीही प्रयत्न केला तरी, ते पूर्णपणे भगवंतात लागत नाहीत. परंतु जेव्हा स्वतःच आपले आपणाला भगवंताचा मानतो तेव्हा मन-बुद्धी भगवंतात तल्लीन होऊन जातात. स्वयं कर्ता आहे आणि मन-बुद्धी करण आहेत. करण कर्त्याच्या आश्रित राहत असते. जर कर्ता भगवंताचा झाला, तर मन-बुद्धिरूपी करण आपोआप भगवंतात लागतील.

साधकाची ही चूक होत असते की, तो आपण स्वतः भगवंतात न लागता मन बुद्धीला भगवंतात लावण्याचा अभ्यास करत असतो. आपण स्वतः भगवंतात लागल्याशिवाय मन-बुद्धी भगवंतात लागणे कठीण जाते. म्हणूनच साधकांची ही व्यापक तक्रार असते की, मन-बुद्धी भगवंतात लागत नाहीत. मन-बुद्धी एकाग्र झाल्याने सिद्धी (समाधी इत्यादी) तर होऊ शकते, परंतु कल्याण तर आपण स्वतः भगवंतात लागल्यानेच होईल.

उपासनेचे तात्पर्य, स्वतः आपले आपणाला भगवंताला अर्पित करावयाचे की, मी भगवंताचाच आहे आणि भगवंतच माझे आहेत. स्वतः ला भगवंतास अर्पित करण्याने नाम-जप, चिंतन, ध्यान, सेवा, पूजा इत्यादी तसेच शास्त्रविहित संपूर्ण क्रिया आपोआप भगवंतासाठीच होतात.

शरीर प्रकृतीचा आणि जीव परमात्म्याचा अंश आहे. प्रकृतीचे कार्य, शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी आणि अहम् शी तादात्म्य, ममता आणि कामना न करता, केवळ भगवंतालाच आपले मानणारा हे म्हणू शकतो की, मी भगवंताचा आहे आणि भगवंत माझे आहेत. असा म्हणणारा किंवा मानणारा भगवंताशी कोणता नवीन संबंध जोडत नाही. चेतन आणि नित्य असल्यामुळे जीवाचा भगवंताशी संबंध स्वतःसिद्ध आहे. परंतु त्या नित्यसिद्ध वास्तविक संबंधाला विसरून जीवाने आपला संबंध प्रकृती आणि तिचे कार्य शरीराशी मानून घेतला जो अवास्तविक आहे. म्हणून जोपर्यंत प्रकृतीशी मानलेला संबंध आहे, तोपर्यंत भगवंताशी आपला संबंध मानण्याची आवश्यकता आहे. प्रकृतीशी मानलेला संबंध तुटताच भगवंताशी आपला वास्तविक आणि नित्य-सिद्ध संबंध प्रगट होतो. त्याची स्मृती प्राप्त होते. ''**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा**'' (१८। ७३)

जडतेला (प्रकृती) सम्मुख झाल्याने अर्थात् त्यांच्यापासून सुखाचा भोग घेत राहिल्यामुळे, जीव शरीराशी ''मी''

पणाचा संबंध जोडूत घेतो अर्थात् ''मी शरीर आहे'' असे समजतो. अशा प्रकारे शरीराशी मानलेल्या संबंधामुळेच तो वर्ण, आश्रम, जाती, नाव, व्यवसाय, तसेच बालपण, तारुण्य इत्यादी अवस्थांना स्मरणात न ठेवताही (स्वाभाविकरूपाने) आपल्याच असल्याचे समजतो, अर्थात् त्यापासून आपण वेगळे आहोत असे समजत नाही.

जीवाची विजातीय शरीर आणि संसाराशी (चुकीने केलेल्या) संबंधाची मान्यताही इतकी दृढ राहत असते की, मुद्दाम आठवण न ठेवताही सदा स्मरण राहत असते. जर त्याने आपल्या सजातीय (चेतन आणि नित्य) परमात्म्याशी असलेल्या आपल्या वास्तविक संबंधाला ओळखले तर, तो कोणत्याही अवस्थेत परमात्म्याला विसरू शकणार नाही. मग उठता-बसता, खाता-पिता, झोपता-जागता, नित्य प्रत्येक अवस्थेत भगवंताचे स्मरण, चिंतन, आपोआप होऊ लागते.

ज्या साधकाचा उद्देश, सांसारिक भोगांचा संग्रह आणि त्यापासून सुख घेण्याचा नसतो, तर एकमात्र परमात्मप्राप्तीच करावयाची आहे, असा असतो, त्याच्याकडून भगवंताशी असलेल्या आपल्या संबंधाची ओळख सुरू झाली—असे समजावे. या संबंधाची पूर्ण जाणीव झाल्यानंतर, साधकाचे ठिकाणी मन, बुद्धी, इंद्रिये, शरीर इत्यादीद्वारा सांसारिक भोग आणि त्याचा संग्रह करण्याची मुळीच इच्छा राहत नसते.

वास्तविक जीव केवळ एकमात्र भगवंताचा असूनही जितक्या अंशात प्रकृतीपासून सुख भोग प्राप्त करू इच्छितो, तितक्याच अंशात त्याने त्या भगवत्संबंधाला दृढतेने पकडलेले नाही. तितक्या अंशात त्याचा प्रकृतीशीच संबंध आहे. म्हणून साधकाने प्रकृतीशी विमुख होऊन, स्वतः आपल्याला केवळ भगवंताचाच समजावे, त्यांच्याच सम्मुख व्हावे.

**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः**—साधकाची श्रद्धा, ज्याला तो सर्वश्रेष्ठ समजेल, तेथेच राहील. श्रद्धा असल्यावर अर्थात् बुद्धीला महत्त्व पटल्यावर तो आपल्या स्वतःच्या निश्चित केलेल्या सिद्धांतानुसार स्वाभाविक जीवन बनवील आणि आपल्या सिद्धांतापासून कधीही विचलित होणार नाही.

जेथे प्रेम असते, तेथे मन आकृष्ट होते आणि जेथे श्रद्धा असते, तेथे बुद्धी तल्लीन होते. प्रेमात प्रेमास्पदाच्या संगाची तसेच श्रद्धेत आज्ञा पालनाची मुख्यता राहत असते.

एकमात्र भगवंताविषयी प्रेम निर्माण झाल्याने,भक्ताला भगवंताशी नित्य-निरंतर संबंधाचा अनुभव होतो, कधी वियोगाचा अनुभव येतच नाही. म्हणूनच भगवंताच्या मतात असे भक्तच वास्तविक उत्तम योगवेत्ता आहेत.

**''ते मे युक्ततमा मताः''** बहुवचन पदाने जी गोष्ट येथे सांगितली गेली आहे, हीच गोष्ट सहाव्या अध्यायाच्या सत्तेचाळीसाव्या श्लोकात **''स मे युक्ततमो मतः''** या एक वचन पदाने म्हटली गेली आहे.*

**परिशिष्ट भाव—'स योगी परमो मतः'** (गीता ६ । ३२), **'स मे युक्ततमो मतः'** (गीता ६ । ४७), **'ते मे युतक्तमा मताः'** (गीता १२ । २)—अशाप्रकारे भगवंताने श्रेष्ठतेबद्दल जे म्हटले आहे त्याचे तात्पर्य हे आहे की, मनुष्य कर्मयोग, ज्ञानयोग इत्यादी कोणत्याही मार्गाने मार्गक्रमण करो, वास्तविक श्रेष्ठ तोच आहे, ज्याला भक्ती प्राप्त झाली आहे. कर्मयोगी आणि ज्ञानयोगी यांना तर शेवटी भक्ती प्राप्त होते, परंतु भक्तियोगी आरंभापासूनच भक्तीत लागलेला असतो (जे कर्मयोग आणि ज्ञानयोगाचे फल आहे), म्हणून तो सर्वात श्रेष्ठ आहे.

ज्ञान आणि भक्ती—दोन्हीही संसाराचे दुःख नाहीसे करण्यात सारखे आहेत परंतु त्या दोन्हीपैकी ज्ञानापेक्षा भक्तीचा महिमा अधिक आहे. ज्ञानात तर अखंड रसाची प्राप्ती होते, परंतु भक्तीत अनंत रसाची प्राप्ती होते. अनंत रसात प्रतिक्षण वर्धमान आनंदाचे तरंग निर्माण करणारा आनंदोल्हास वाढविणारा एक विलक्षण आनंद असतो. जसे संसारात एखाद्या वस्तूचे ज्ञान होते की, 'हे रुपये आहेत, ते घड्याळ आहे' इत्यादी. तर हे ज्ञान केवळ अज्ञानाला (अजाणपणाला) नाहीसे करते, तसेच तत्त्वज्ञान केवळ अज्ञानाचा नाश करते. अज्ञानाचा नाश झाल्याने दुःख, भय, जन्म-मरणरूप बंधन—हे सर्व समाप्त होतात. परंतु प्रेम (भक्ती) ज्ञानापेक्षाही विलक्षण आहे. ज्ञान भगवंतापर्यंत पोहचत नाही परंतु प्रेम भगवंतापर्यंत पोहचते. ज्ञानाचा अनुभव करणारा तर स्व असतो, परंतु प्रेमाचा अनुभव करणारा आणि ज्ञाता भगवान् असतात. भगवान् ज्ञानाचे भुकेले नाहीत,

* अकराव्या अध्यायाच्या चौपन्नाव्या श्लोकात भगवान् सांगून गेले आहेत की, अनन्यभक्तीद्वारा साधक मला प्रत्यक्ष पाहू शकतो, तत्त्वाने जाणून घेऊ शकतो आणि मला प्राप्त होऊ शकतो, परंतु अठराव्या अध्यायाच्या पंचावन्नाव्या श्लोकात भगवंतांनी निर्गुण उपासकासाठी आपणाला तत्त्वाने जाणून घेणे आणि प्राप्तीचाच विषय सांगितला आहे, दर्शन देण्याविषयी काहीही म्हटले नाही. यावरुन हे स्पष्ट होते की, सगुण उपासकांना भगवंताचे दर्शनही होते. ही त्यांची विशेषता आहे.

भगवंतांनी सहाव्या अध्यायाच्या सत्तेचाळीसाव्या श्लोकात आपल्या सगुणरूपाविषयी श्रद्धा प्रेम ठेवणाऱ्या साधकाला संपूर्ण योग्यात श्रेष्ठ म्हटले आहे. तात्पर्य, भगवंताला आपले समजून त्यांच्या परायण राहणारा साधकच भगवंताला विशेष प्रिय आहे.

तर प्रेमाचे भुकेले आहेत. मुक्त झाल्यावर ज्ञानयोगी संतुष्ट, तृप्त होतो (गीता ३। १७). परंतु प्रेम प्राप्त झाल्यावर भक्त संतुष्ट होत नाही तर त्याचा आनंद उत्तरोत्तर वाढतच राहतो. म्हणून शेवटचे तत्त्व प्रेम आहे, मुक्ती नाही.

जसे 'हे रुपये आहेत'—असे ज्ञान झाले तर अज्ञान नाहीसे झाले परंतु ते प्राप्त होण्यात लोभ निर्माण झाला की, 'आणखी मिळावेत, आणखी मिळावेत' तर त्यात एक विशेष रस येतो. तसेच भक्तीत एक विशेष रस येतो. तात्पर्य, संसारात जसे रुपयात आकर्षण करण्याची शक्ती लोभातच आहे, तसेच भगवंतात आकर्षण करण्याची शक्ती प्रेमातच आहे, ज्ञानात नाही. धनाचा लोभ तर अधिक पतन करतो, परंतु प्रेम ज्ञानापेक्षाही अधिक उन्नत करते. वस्तूच्या आकर्षणात जो रस आहे तो रस वस्तूत आणि वस्तूच्या ज्ञानात नाही.

**विवेक**मार्ग (ज्ञानयोग) यात सत् आणि असत् दोन्हींची मान्यता बरोबरच राहत असल्यामुळे असत्‌ची अती सूक्ष्म सत्ता अर्थात् अती सूक्ष्म अहम् खूप काळ बरोबर राहतो. हा सूक्ष्म अहम् अथवा अहम्‌चा संस्कार मुक्त झाल्यावरही राहतो. हा सूक्ष्म अहम् जन्म-मरण देणारा नसतो परंतु हा ईश्वराशी अभिन्न होण्यात बाधक होतो. म्हणून विवेक मार्गात ज्ञान्यांची अथवा दार्शनिकांची मुक्ती होऊ शकते परंतु ईश्वराशी अभिन्नता अर्थात् प्रेम होईल—हा नियम नाही. या सूक्ष्म अहम्‌मुळेच दार्शनिकात आणि त्यांच्या दर्शनात परस्पर भेद राहतो. परंतु विश्वासमार्गात (भक्तियोगात) आरंभापासूनच भक्त एका ईश्वराशिवाय दुसऱ्या कोणाची स्वतंत्र सत्ता मानीत नाही. म्हणून तो ईश्वराशी अभिन्न होतो. ईश्वराशी अभिन्न झाल्यावर अर्थात् प्रेमाचा उदय झाल्यावर सूक्ष्म अहम् आणि त्यापासून निर्माण होणारे संपूर्ण दार्शनिक मतभेद सर्वथा समाप्त होतात.* अर्थात् द्वैत, अद्वैत, द्वैताद्वैत, विशिष्टा द्वैत इत्यादी जितके काही मतभेद, आहेत ते सर्व वासुदेवरूप होतात, जे वास्तविक आहे. म्हणून **'वासुदेवः सर्वम्'** चा अनुभव करणाऱ्या भक्ताच्या हृदयात कोण्या एका मताचा आग्रह राहत नाही, तर सर्वांचा सारखा आदर राहतो. कोण्या एका मताचा आग्रह न राहिल्याने त्याच्याद्वारा कोणाचाही कधी अनादर होत नाही. तात्पर्य हे निघाले की, ज्ञानाच्या ऐक्यापेक्षा प्रेमाचे ऐक्य श्रेष्ठ आहे. ज्ञानात परमात्म्याशी अंतर आणि भेद समाप्त होतात, परंतु अभिन्नता (भेट) होत नाही. परंतु प्रेमात अंतर, भेद आणि भिन्नता तिन्हीही समाप्त होतात. म्हणून वास्तविक अद्वैत प्रेमातच आहे. प्रेमात इतकी शक्ती आहे की, यात भक्त भगवंताचाही इष्ट होतो. ज्ञानमार्गी मुक्तीला सर्वश्रेष्ठ मानतात, मग ते मुक्तीपेक्षाही श्रेष्ठ असलेल्या प्रेमाला (प्रेमाभक्ती अथवा पराभक्तीला) कसे समजू शकतील? मुक्तीत तर अखंड रस आहे, परंतु प्रेमात अनंत (प्रतिक्षण वर्धमान) रस आहे. प्रेम हे मुक्ती, तत्त्वज्ञान, स्वरूपबोध, आत्मसाक्षात्कार, कैवल्यापेक्षाही श्रेष्ठ आहे.†

कर्मयोग आणि ज्ञानयोग—ह्या दोन लौकिकनिष्ठा आहेत. (गीता ३-३) परंतु भक्तियोग लौकिकनिष्ठा अर्थात् प्राण्याची निष्ठा नाही. जो भगवंतात लागून जातो तो भगवन्निष्ठ होतो अर्थात् त्याची निष्ठा अलौकिक असते. त्याचे साधन आणि साध्य—दोन्ही भगवंतच असतात. म्हणून भक्तियोग साधनही आहे आणि साध्यही आहे. म्हणूनच तर म्हटले आहे—**'भक्त्या सञ्जातया भक्त्या'** (श्रीमद्भा० ११। ३। ३१) अर्थात् भक्तीपासून भक्ती उत्पन्न होते. श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्म निवेदन—ही नऊ प्रकारची 'साधन भक्ती' आहे$ आणि त्याच्यापेक्षा प्रेमलक्षणा भक्ती 'साध्य भक्ती' आहे, जी कर्मयोग आणि ज्ञानयोग सर्वांची साध्य आहे. (गीता १८-५४) ही साध्यभक्तीच सर्वोपरी प्रापणीय तत्त्व आहे.

ज्ञानयोग साधक सत्-असत्‌च्या विवेकाला महत्त्व देऊन असत्‌चा त्याग करतो. असत्‌चा त्याग केल्याने त्यागीची आणि त्याज्य वस्तूची सत्ता भावरूपाने पुष्कळ काळपर्यंत बरोबरच राहते. म्हणून ज्ञानयोगात असत्‌चा सर्वथा त्याग फार काळाने होतो. कर्मयोगात साधक असत् वस्तूंना त्याज्य न मानता सेवा-सामुग्री मानतो. त्याग करण्यात निकृष्ट वस्तूचा त्याग सुगमतेने होतो परंतु आवडत्या वस्तूंचा त्याग करणे कठीण जाते. म्हणून आवडत्या वस्तूचा त्याग करण्यापेक्षा ती वस्तू दुसऱ्याच्या सेवेत लावणे सोपे जाते. निष्कामभापूर्वक दुसऱ्यांच्या सेवेत लावल्याने असत्‌चा त्याग सुगमतेने आणि लवकर होतो. भक्तियोगात जगताला भगवंताचे अथवा भगवत्स्वरूप मानल्याने जगत् (असत्) फार लवकर लुप्त होते आणि भगवान् राहतात.

---

* प्रेम भगति जल बिनु रघुराई। अभिअंतर मल कबहुँ न जाई॥ (मानस उत्तर० ४९। ३)

† द्वैतं मोहाय बोधात्प्रागजाते मनीषया।
भक्त्यर्थं कल्पितं (स्वीकृतं) द्वैतमद्वैतादपि सुन्दरम्॥ (बोधसार भक्ति० ४२)

'बोधापूर्वीचे द्वैत मोहात फसविते, परंतु बोध झाल्यावर भक्तीसाठी स्वीकृत कलेले द्वैत अद्वैतापेक्षाही अधिक सुंदर असते.'

$ श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्।
अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्॥ (श्रीमद्भा० ७। ५। २३)

अशाप्रकारे ज्ञानयोगापेक्षा कर्मयोगात असत्चा (जडतेचा) शीघ्र त्याग होतो आणि कर्मयोगापेक्षा भक्तियोगात असत्चा शीघ्र त्याग होतो. कारण भक्तीत असत् राहतच नाही—'**सदसच्चाहम्**' (गीता ९। १९). म्हणून ज्ञानयोगापेक्षा कर्मयोग श्रेष्ठ आहे—'**तयोस्तु कर्मसन्न्यासात्कर्मयोगो विशिष्यते**' (गीता ५। २) आणि कर्मयोगापेक्षा—भक्तियोग श्रेष्ठ आहे—'**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना। श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः**'॥ (गीता ६। ४७).

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी सगुण उपासकांना सर्वश्रेष्ठ योगी म्हटले. यावर असा प्रश्न होऊ शकतो की, निर्गुण उपासक सर्वश्रेष्ठ योगी नाहीत काय ? याच्या उत्तरात भगवान् म्हणतात.*

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते।**
**सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम्॥ ३॥**
**सन्नियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः।**
**ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः॥ ४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = आणि | **कूटस्थम्** | = निर्विकार, | **सर्वभूतहिते** | = प्राणीमात्राच्या हितात |
| **ये** | = जी (आपल्या) | **अचलम्** | = अचल, | **रताः** | = प्रीती असणारी (आणि) |
| **इन्द्रियग्रामम्** | = इंद्रिय समूहांना | **ध्रुवम्** | = ध्रुव, | **सर्वत्र** | = सर्व ठिकाणी |
| **सन्नियम्य** | = सुचारूरूपाने वश करून | **अक्षरम्** | = अक्षर | **समबुद्धयः** | = समबुद्धीअसणारी माणसे (उपासक) |
| **अचिन्त्यम्** | = चिंतनात न येणारे | **च** | = आणि | **माम्, एव** | = मलाच |
| **सर्वत्रगम्** | = सर्व ठिकाणी परिपूर्ण | **अव्यक्तम्** | = अव्यक्त यांची | **प्राप्नुवन्ति** | = प्राप्त होतात. |
| **अनिर्देश्यम्** | = न दिसणारे | **पर्युपासते** | = तत्परतेने उपासना करतात, | | |
| | | **ते** | = ती | | |

***व्याख्या***— **तु**—येथे "तु" पद साकार उपासकांपेक्षा निराकार उपासकांची भिन्नता दाखविण्यासाठी आले आहे.

**सन्नियम्येन्द्रियग्रामम्**—"**सम्**" आणि "**नि**" दोन उपसर्गाने युक्त "**सन्नियम्य**" पद देऊन भगवंतांनी हे दाखविले आहे की, सर्व इंद्रियांना सम्यक् प्रकाराने तसेच पूर्ण रीतीने वश करून घ्यावे. इंद्रिये योग्य रीतीने पूर्णपणे वश न झाल्यास निर्गुण तत्त्वाच्या उपासनेत काठिण्य निर्माण होते. सगुण उपासनेत तर ध्यानाचा विषय सगुण भगवान् असल्याने, इंद्रिये भगवंताकडे आकृष्ट होऊ शकतात. कारण भगवंताच्या सगुण स्वरूपात इंद्रियांना आपले विषय मिळून जातात. म्हणून सगुण उपासनेत इंद्रिय संयमाची आवश्यकता असली, तरीही याची इतकी अधिक आवश्यकता नसते, जितकी निर्गुण उपासनेत असते. निर्गुण-उपासनेत चिंतनाचा कसलाही आधार नसल्याने इंद्रियांचा सम्यक् संयम झाल्या-शिवाय (आसक्ती राहिल्यास) विषयाकडे मन धाव घेऊ शकते आणि विषयाचे चिंतन झाल्याने पतन होण्याची अधिक संभावना राहते. (२। ६२-६३) म्हणून निर्गुण उपासकासाठी सर्व इंद्रियांच्या विषयांना हटवून सम्यक् प्रकाराने पूर्णपणे वश करणे आवश्यक आहे. इंद्रियांना केवळ बाहेरुन वश करून भागत नाही, तर साधकाच्या अंतःकरणात-ही विषयाविषयी आसक्ती राहता कामा नये, कारण जोपर्यंत विषयाचे ठिकाणी आसक्ती असते, तोपर्यंत ब्रह्माची प्राप्ती होणे कठीण आहे. (१५। ११)

गीतेत इंद्रियांना वश करण्यासंबंधी विशेषत्वाने विवेचन जितके निर्गुणोपासनेत आणि कर्मयोगात आले आहे, तितके सगुणोपासनेत आलेले नाही.

**अचिन्त्यम्**—मन-बुद्धीचा विषय नसल्याकारणाने "**अचिन्त्यम्**" पद निर्गुण-निराकार ब्रह्माचे वाचक आहे, कारण मन-बुद्धी प्रकृतीचे कार्य असल्याने, संपूर्ण प्रकृतीलाही आपला विषय करू शकत नाही तर मग प्रकृतीच्या पलीकडे असलेला परमात्मा यांचा कसा विषय होऊ शकतो?

संपूर्ण प्राकृतिक पदार्थ चिन्त्य आहेत आणि परमात्मा प्रकृतीच्या पलीकडे असल्यामुळे संपूर्ण चिन्त्य पदार्थांपेक्षाही पलीकडचा आणि विलक्षण आहे. प्रकृतीचे साहाय्य घेतल्याशिवाय त्याचे चिंतन, वर्णन केले जाऊ शकत नाही. म्हणून परमात्म्याला स्वनेच (करणनिरपेक्ष-ज्ञान) जाणले

जाऊ शकते, प्रकृतीचे कार्य मन-बुद्धी इत्यादीने (करण-सापेक्ष ज्ञान) नव्हे!

**सर्वत्रगम्**—सर्व देश, काळ, वस्तू आणि व्यक्तीत परिपूर्ण असल्याने ब्रह्म "**सर्वत्रगम्**" आहे. सर्वव्यापी असल्याकारणाने ते सीमित मन-बुद्धी-इंद्रियांनी ग्रहण केले जाऊ शकत नाही.

**अनिर्देश्यम्**—ज्याला इंदतेने दाखवले जाऊ शकत नाही अर्थात् जे भाषा, वाणी इत्यादीचा विषय नाही, ते "**अनिर्देश्यम्**" आहे. निर्देश (संकेत) त्यांचाच केला जाऊ शकतो, जे जाती, गुण क्रिया व संबंधाने युक्त असते आणि देश, काळ, वस्तू तसेच व्यक्ती यांनी परिच्छिन्न असते, परंतु जे चिन्मय तत्त्व सर्वत्र परिपूर्ण आहे, त्याचा संकेत जड भाषा, वाणीने कसा केला जाऊ शकतो ?

**कूटस्थम्**—हे पद निर्विकार, सदा एकरस राहणाऱ्या सच्चिदानंदघन ब्रह्माचे वाचक आहे. सर्व देश, काळ, वस्तू, व्यक्ती इत्यादीत राहत असूनही, ते तत्त्व सदा निर्विकार आणि निर्लिप्त असते त्यात कधी किंचिन्मात्रही कोणते परिवर्तन होत नाही. म्हणून ते "**कूटस्थ**" आहे. कूट अर्थात् ऐरणीवर निरनिराळे दागिने, शस्त्र, अवजारे इत्यादी पदार्थ घडविले जातात, परंतु ती ऐरण जशीच्या तशीच राहते. त्याचप्रमाणे संसारातील भिन्न भिन्न प्राणी-पदार्थांची उत्पत्ती, स्थिती आणि विनाश झाला तरीही, परमात्मा सदा जसाच्या तसाच राहतो.

**अचलम्**—हे पद येण्या-जाण्याच्या क्रियेहून संपूर्णपणे रहित असलेल्या ब्रह्माचे वाचक आहे. प्रकृती चल आहे आणि ब्रह्म अचल आहे.

**ध्रुवम्**—ज्याची सत्ता निश्चित (सत्य) आणि नित्य आहे त्याला "ध्रुव" म्हणतात. सच्चिदानंदघन ब्रह्म सत्तारूपाने सर्वत्र विद्यमान असल्याने "**ध्रुवम्**" आहे.

निर्गुण-ब्रह्माच्या आठही विशेषणांमध्ये सर्वात महत्त्वपूर्ण विशेषण "**ध्रुवम्**" आहे. ब्रह्मासाठी अनिर्देश्य, अचिन्त्य, इत्यादी निषेधात्मक विशेषण दिले गेल्याने, कोणी असे समजू नये की, ते नाहीच, म्हणून येथे "**ध्रुवम्**" विशेषण देऊन, त्या तत्त्वाची निश्चित सत्ता दाखवली गेली आहे. त्या तत्वाचा कधी किंचिन्मात्रही अभाव नसतो. त्याच्या सत्तेनेच असत्‌ला (संसार) सत्ता मिळत आहे—**जासु सत्यता जे जड माया। भास सत्य इव मोह सहाया॥** (मानस १। ११७। ४)

**अक्षरम्**—ज्याचे कधी क्षरण अर्थात् विनाश होत नाही, तसेच ज्यात कधी कोणती उणीव येत नाही, ते सच्चिदानंदघन ब्रह्म "**अक्षरम्**" आहे.

**अव्यक्तम्**—जे व्यक्त नसते, अर्थात् मन, बुद्धी, इंद्रियांचा विषय नसते आणि ज्याचा कोणता आकार किंवा रूप नसते त्याला "**अव्यक्तम्**" म्हटले गेले आहे.

**पर्युपासते**—हे पद येथे निर्गुण उपासकांच्या सम्यक् उपासनेचे बोधक आहे. शरीरासह संपूर्ण पदार्थ व कर्म यामध्ये वासना तसेच अहंभावाचा अभाव तसेच भावरूप असलेल्या सच्चिदानंदघन परमात्म्याविषयी अभिन्नभावाने नित्य-निरंतर दृढ स्थित राहणे हेच उपासना करणे आहे.

या श्लोकात आठ विशेषणांनी ज्या विशेष वस्तू-तत्त्वाचा निर्देश केला गेला आहे आणि त्यायोगे जी विशेष वस्तू लक्षात येते ती बुद्धीविशिष्ट ब्रह्माचेच स्वरूप आहे, जे पूर्ण नसते. कारण (लक्षण आणि विशेषणांनी रहित) निर्गुण-निर्विशेष ब्रह्माचे स्वरूप, (जे बुद्धीच्या पलीकडे आहे) कोणत्याही प्रकारे पूर्णतः विषय होऊ शकत नाही. मात्र ह्या विशेषणांना लक्ष्यात घेऊन जी उपासना केली जाते, ती निर्गुण-ब्रह्माचीच उपासना होय आणि त्याचा परिणाम म्हणून प्राप्ती देखील निर्गुण-ब्रह्माचीच होते.

## विशेष संकेत

परमात्म्याला तत्त्वतः समजून घेण्यासाठी दोन प्रकारची विशेषणे दिली जातात. निषेधात्मक आणि विधेयात्मक. परमात्म्याची अक्षर, अनिर्देश्य, अव्यक्त, अचिन्त्य, अचल, अव्यय, असीम, अपार, अविनाशी इत्यादी विशेषणे "निषेधात्मक" आहेत आणि सर्वव्यापी, कूटस्थ, ध्रुव, सत्, चित्, आनंद इत्यादी विशेषणे "**विधेयात्मक**" आहेत. परमात्म्याच्या निषेधात्मक विशेषणाचे तात्पर्य, प्रकृतीशी परमात्म्याची "असंगता" दाखविण्यात आहे आणि विधेयात्मक विशेषणांचे तात्पर्य परमात्म्याची स्वतंत्र "सत्ता" दाखविण्यात आहे.

परमात्मतत्त्व सांसारिक प्रवृत्ती आणि निवृत्ती दोन्हीच्या पलीकडील (सहज निवृत्त) आणि दोघांना समानरूपाने प्रकाशित करणारे आहे. अशा निरपेक्ष परमात्मतत्त्वाचा निर्देश करण्यासाठी आणि बुद्धीला परमात्म्याजवळ पोहचविण्यासाठीच निरनिराळ्या विशेषणांनी परमात्म्याचे वर्णन केले जाते.

गीतेत परमात्म्याच्या आणि जीवात्म्याच्या स्वरूपाचे वर्णन बहुतेक सारखेच मिळते. परमात्म्यासाठी येथे जी विशेषणे दिली गेली आहेत, तीच विशेषणे गीतेत जीवात्म्यासाठीही दिली गेली आहेत. जसे दुसऱ्या अध्यायाच्या चोवीसाव्या-पंचवीसाव्या श्लोकांत, "**सर्वगतः**", "**अचलः**", "**अव्यक्तः**", "**अचिन्त्यः**", इत्यादी आणि पंधराव्या

अध्यायाच्या सोळाव्या श्लोकात "**कूटस्थः**" तसेच "**अक्षरः**" विशेषण जीवात्म्यासाठी आले आहे. त्याचप्रमाणे सातव्या अध्यायाच्या पंचवीसाव्या श्लोकात "**अव्ययम्**" विशेषण परमात्म्यासाठी आणि चौदाव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात "**अव्ययम्**" विशेषण जीवात्म्यासाठी आले आहे.

संसारात व्यापकरूपानेही परमात्म्याला आणि जीवात्म्याला सारखे सांगितले गेले आहे. जसे आठव्या अध्यायाच्या बावीसाव्या तसेच अठराव्या अध्यायाच्या सेहेचाळिसाव्या श्लोकात "**येन सर्वमिदं ततम्**" पदाने आणि नवव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकात "**मया ततमिदं सर्वं**" पदाने परमात्म्याला संपूर्ण जगतात व्याप्त असल्याचे म्हटले आहे. त्याचप्रमाणे दुसऱ्या अध्यायाच्या सतराव्या श्लोकात "**येन सर्वमिदं ततम्**" पदाने जीवात्म्यालाही संपूर्ण जगतात व्याप्त म्हटले गेले आहे.

ज्याप्रमाणे डोळ्यांच्या दृष्टीची आपसात टक्कर होत नाही अथवा व्यापक असूनही शब्दांची परस्पर टक्कर होत नाही, त्याचप्रमाणे (द्वैतमतानुसार) संपूर्ण जगतात समान-रूपाने व्याप्त असूनही, निरवयव असल्याकारणाने, परमात्मा आणि जीवात्मा यांच्या सर्वव्यापकतेची आपसात टक्कर होत नाही.

**सर्वभूतहिते रताः**—कर्मयोगाच्या साधनेत आसक्ती, ममता, कामना आणि स्वार्थाच्या त्यागाची मुख्यता असते. मनुष्य जेव्हा शरीर, धन, संपत्ती इत्यादी पदार्थांना "आपले," आणि "आपल्यासाठी" न समजता, त्यांना दुसऱ्यांच्या सेवेत उपयोगात आणतो तेव्हा त्याची आसक्ती, ममता, कामना आणि स्वार्थभाव ह्याचा त्याग आपोआप होतो. ज्याचा उद्देश प्राणीमात्राची सेवा करण्याचाच असतो, तो आपल्या शरीर आणि पदार्थांना (दीन-दुःखी, अभावग्रस्त) प्राण्यांच्या सेवेत उपयोगात आणणारच. शरीराला दुसऱ्याच्या सेवेत उपयोगात आणल्याने, "अहंता" आणि पदार्थांना दुसऱ्यांच्या सेवेत उपयोगात आणल्याने "ममता" नष्ट होते. साधकाची पूर्वीपासूनच अशी धारणा असते की, जे पदार्थ सेवेत उपयोगात येत आहेत ते सर्व सेव्याचेच आहेत. म्हणून कर्मयोगाच्या साधनेत संपूर्ण प्राण्यांच्या हितात रत राहणे अत्यंत आवश्यक आहे. म्हणून "**सर्वभूतहिते रताः**" पदाचा प्रयोग, कर्मयोगाचे आचरण करणाऱ्यासाठीच करणे, अधिक युक्तिसंगत आहे. परंतु भगवंतांनी या पदाचा प्रयोग येथे तसेच पाचव्या अध्यायाच्या पंचवीसाव्या श्लोकात, दोन्हीही ठिकाणी ज्ञानयोगी यांच्या संबंधात केला आहे. यावरुन हे सिद्ध होते की, कर्माशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद करण्यासाठी कर्मयोगाच्या प्रणालीला ज्ञानयोगातही स्वीकार करण्याची गरज आहे.

एक गोष्ट विशेष करून लक्षात ठेवण्यासारखी आहे. ती अशी की, शरीर, पदार्थ आणि क्रियांनी जी सेवा केली जाते ती सीमितच असते, कारण संपूर्ण पदार्थ आणि क्रिया मिळूनही सिमितच आहेत. परंतु सेवेत प्राणीमात्राच्या हिताचा भाव असीम असल्याने सेवा देखील असीम होत असते. म्हणून पदार्थ आपल्याजवळ असले तरी (त्याविषयी ममता, आसक्ती इत्यादी न करता) त्यांना संपूर्ण प्राण्यांचे समजून त्यांच्याच सेवेत उपयोगात आणावयाचे आहे, कारण ते पदार्थ समष्टीचेच आहेत. असा असीमभाव असल्यामुळे जडतेशी संबंध-विच्छेद झाल्याने, साधकाला असीम तत्त्वाची (परमात्म्याची) प्राप्ती होते. कारण पदार्थांना व्यक्तिगत समजल्याने मनुष्याचे ठिकाणी परिच्छिन्नता (एकदेशीयता) तसेच विषमता राहते आणि पदार्थांना व्यक्तिगत न समजता संपूर्ण प्राण्यांच्या हिताचा भाव ठेवल्याने परिच्छिन्नता तसेच विषमता नष्ट होते. या उलट सामान्य मनुष्याचे ठिकाणी ममता असणाऱ्या प्राण्यांची सेवा करण्याचा सीमितभाव असल्याने, मग त्याने आपले सर्वस्व जरी सेवेत उपयोगात आणले तरीही, पदार्थांविषयी आणि ज्यांची सेवा केली जात आहे त्यांचेविषयी आसक्ती, ममता इत्यादी असल्याने, (सीमितभाव असल्याकारणाने) त्याला असीम परमात्मतत्त्वाची प्राप्ती होत नाही. म्हणून असीम परमात्म- तत्त्वाच्या प्राप्तीसाठी प्राणीमात्राच्या हितात रती अर्थात् प्रीतीरूपी असीमभाव असणे आवश्यक आहे. "**सर्वभूतहिते रताः**" ही पदे त्याच भावाला व्यक्त करतात.

ज्ञानयोगाचा साधक जडतेशी संबंध-विच्छेद तर करू इच्छितो, परंतु जोपर्यंत त्याच्या अंतःकरणात नाशवान् पदार्थाविषयी आदर आहे, तोपर्यंत पदार्थांना मायीक अथवा स्वप्नवत् समजून त्यांचा सहज त्याग करणे, त्याच्यासाठी कठीण जाते. परंतु कर्मयोगाचा साधक पदार्थांना दुसऱ्यांच्या सेवेत उपयोगात आणून त्यांचा त्याग ज्ञानयोग्यापेक्षा सुगमतेने करू शकतो. ज्ञानयोग्याचे ठिकाणी तीव्र वैराग्य असल्यानेच पदार्थांचा त्याग होऊ शकतो परंतु कर्मयोगी मंद वैराग्यातही पदार्थांचा त्याग (परहितात) करू शकतो. प्राण्यांच्या हितात पदार्थांचा सदुपयोग करण्याने जडतेशी सुगमतेने संबंध-विच्छेद होतो. भगवंतांनी येथे "**सर्वभूतहिते रताः**" पद देऊन हेच म्हटले आहे की, प्राणीमात्राच्या हिताविषयी रत राहिल्याने पदार्थाविषयी आदरबुद्धी राहत असूनही, जडतेशी संबंध-विच्छेद सुगमतेने होईल. प्राणीमात्राचे हित करण्यासाठी

कर्मयोगच सुगम उपाय आहे.

निर्गुण उपासकांच्या साधनेच्या अंतर्गत अनेक अवांतर भेद असूनही मुख्य दोन भेद आहेत. (१) जड-चेतन आणि चर-अचर यारूपात जे काही प्रतीतीस येत असते, ते सर्व आत्मा अथवा ब्रह्म आहे आणि (२) जो काही दृश्य वर्ग प्रतीत होतो; तो अनित्य, क्षणभंगुर आणि असत् आहे—अशा प्रकारे संसाराचा बाध करून जे तत्त्व शिल्लक राहते, ते आत्मा अथवा ब्रह्म आहे.

प्रथम साधनेत "सर्व काही ब्रह्म आहे" एवढे केवळ शिकण्याने ज्ञाननिष्ठा सिद्ध होत नाही. जोपर्यंत अंत:करणात आसक्ती अर्थात् काम-क्रोधादी विकार आहेत, तोपर्यंत ज्ञान- निष्ठा सिद्ध होणे फार कठीण आहे. जसे आसक्ती नष्ट करण्यासाठी कर्मयोग्याला सर्व प्राण्यांच्या हितात रती असणे आवश्यक आहे, तसे निर्गुण उपासना करणाऱ्या साधका- साठीही प्राणीमात्राच्या हितात रती असणे आवश्यक आहे. तेव्हाच आसक्ती नाहीशी होऊन ज्ञाननिष्ठा सिद्ध होऊ शकते. याच गोष्टीकडे लक्ष वेधण्यासाठी येथे "**सर्वभूतहिते रता:**" पद आलेले आहे.

दुसऱ्या साधनेत जे साधक संसाराविषयी उदासीन राहून एकांतातच तत्त्वाचे चिंतन करत राहतात. त्यांच्यासाठी कर्मांचा स्वरूपाने त्याग करणे सहायक तर होत असते, परंतु केवळ कर्मांचा स्वरूपाने त्याग केल्यानेच सिद्धी प्राप्त होत नाही (गीता ३। ४) उलट सिद्धी प्राप्त करण्यासाठी भोगाविषयी वैराग्य आणि शरीर, इंद्रिय, मन, बुद्धी याविषयी जो आपले- पणा आहे त्याच्या त्यागाची अत्यंत आवश्यकता आहे. म्हणून वैराग्य आणि निर्ममतेसाठी "**सर्वभूतहिते रता:**" होणे आवश्यक आहे.

ज्ञानयोगाचा साधक बहुतेक समाजापासून दूर, असंग राहत असतो. म्हणून त्यात व्यक्तित्व राहत असते, जे दूर करण्यासाठी संपूर्ण संसाराच्या हिताचा भाव राहणे अत्यंत आवश्यक आहे.

वास्तविक असंगता शरीराशीच असली पाहिजे. समाजापासून असंगता झाल्यास अहंभाव दृढ होत असतो, अर्थात् नष्ट होत नाही. साधक जोपर्यंत स्वत: ला शरीरापासून निश्चित वेगळा आहे, असा अनुभव करीत नाही, तोपर्यंत तो संसारापासून केवळ वेगळा राहिल्याने, त्याचे ध्येय सिद्ध होत नाही. कारण शरीरही संसाराचेच तर अंग आहे आणि शरीराशी तादात्म्य आणि ममतेचे न राहणेच त्यापासून वास्तविक वेगळे होणे आहे. तादात्म्य आणि ममता नष्ट करण्यासाठी साधकाने प्राणीमात्राच्या हिताविषयी व्यस्त राहणे अत्यंत आवश्यक आहे.

दुसरी गोष्ट ही आहे की, साधक सर्वदा एकांतातच राहील ही गोष्टही संभव नाही. कारण शरीरनिर्वाहासाठी त्याला व्यवहार क्षेत्रात यावेच लागते आणि वैराग्याची उणीव असल्यास त्याच्या व्यवहारात अभिमान निर्माण होऊन कठोरता येण्याची शक्यता असते. तसेच कठोरता आल्याने त्याच्या व्यक्तित्वाचा (अहंभावाचा) नाश होत नाही. म्हणून त्याला तत्त्वाची प्राप्ती होणे कठीण जाते. व्यवहारात कुठेही कठोरता येऊ नये यासाठीही हे आवश्यक आहे की, साधकाने संपूर्ण प्राण्यांच्या हिताविषयी रत रहावे. अशा ज्ञानयोगी साधकाकडून जरी सेवा कार्याचा विस्तार झाला नाही तरी, भगवान् म्हणतात (सर्व प्राण्यांच्या हिताविषयी रती असल्याकारणाने) तो सुद्धा मलाच प्राप्त होतो.

सगुणोपासक आणि निर्गुणोपासक दोन्हीही प्रकारच्या साधकांसाठी संपूर्ण प्राण्यांच्या हिताचा भाव ठेवणे जरूरी आहे. संपूर्ण प्राण्यांच्या हिताहून आपले हित वेगळे समजल्यानेच "अहम्" अर्थात् व्यक्तित्व कायम राहते, जे साधकासाठी कालान्तराने बाधक ठरते. वास्तविक कल्याण "अहम्" नष्ट झाल्यावरच होत असते. आपल्यासाठी केलेल्या साधनेने "अहम्" कायम राहत असतो. म्हणून "अहम्" चा पूर्णपणे नाश करण्यासाठी साधकाने प्रत्येक क्रिया (खाणे, पिणे, झोपणे, इत्यादी तसेच जप, ध्यान, पाठ, स्वाध्याय इत्यादीही) संसाराच्या हितासाठीच केली पाहिजे. संसाराच्या हितातच आपले हित अंतर्भूत असते. भगवंताची संपूर्ण शक्ती परहितातच खर्च होत असते. म्हणून जो सर्वांच्या हिताविषयी रत राहील, भगवंताची शक्ती त्याला साहाय्य करील.

केवळ दुसऱ्यांना वस्तू देणे वा शरीराने दुसऱ्यांची सेवा करणे हीच सेवा नव्हे, तर आपल्यासाठी कशाचीही इच्छा न ठेवता दुसऱ्याचे हित कसे होईल, त्याला सुख कसे लाभेल, या भावनेने कर्म करणे हीच सेवा होय. आपल्याला सेवक म्हणवून घेण्याचाही भाव मनात यावयास नको. सेवा तेव्हाच होऊ शकते, जेव्हा सेवक ज्याची सेवा करत असतो, त्याला आपल्याशी अभिन्न (स्वत:च्या शरीराप्रमाणे) समजतो आणि मोबदल्यात त्याच्याकडून काहीही अपेक्षा ठेवत नाही.

जसा मनुष्य कोणाच्याही उपदेशाशिवाय आपल्या शरीराची सेवा स्वत:च फार काळजीने करत असतो आणि सेवा करण्याचा अभिमानही ठेवत नाही, तसे सर्वत्र भगवद्बुद्धी झाल्यामुळे भक्ताची सर्वांच्या हिताविषयी रती आपोआप होते. त्यांच्याकडून प्राणीमात्राचे कल्याण होत असते, परंतु

त्यांच्या मनात असा लेशमात्रही भाव येत नाही की, आपण कोणाचे कल्याण करत आहोत. त्यांचे ठिकाणी अहंतेचा संपूर्णपणे अभाव असतो, म्हणून अशा जीवन्मुक्त महापुरुषांचा आदर्श समोर ठेवून साधकाने सर्वत्र आत्मबुद्धी करून संसाराच्या कोणत्याही प्राण्याला किंचिन्मात्रही दु:ख न देता, त्यांच्या हिताविषयी सदा तत्परतेने स्वाभाविकच रत असावे.

**सर्वत्र समबुद्धय:**—या पदाचा भाव असा आहे की, निर्गुण-निराकार ब्रह्माच्या उपासकांची दृष्टी संपूर्ण प्राणी, पदार्थात परिपूर्ण असलेल्या परमात्म्यावरच असल्याकारणाने विषम नसते, कारण परमात्मा सम आहे (५। १९)

या ठिकाणी भगवान् ज्ञाननिष्ठा असणाऱ्या उपासका-साठी या पदाचा प्रयोग करून एक विशेष भाव प्रगट करतात की, ज्ञानमार्गीयांसाठी एकांतात राहून तत्त्वाचे चिंतन करणे हेच एकमात्र साधन नव्हे, कारण "**समबुद्धय:**" पदाची सार्थकता विशेषत्वाने व्यवहार काळातच होत असते. दुसरी गोष्ट, संसारापासून शरीराला निर्जन स्थानात घेऊन जाणे हेच संपूर्णपणे एकांत सेवन नव्हे, कारण शरीरही तर संसाराचेच एक अंग आहे. शरीर आणि संसाराला वेगवेगळे पाहणे विषमबुद्धी होय. म्हणून शरीर आणि संसाराला एक समजल्यानेच समबुद्धी होऊ शकते. वास्तविक एकांताची सिद्धी तर परमात्मतत्त्वाव्यतिरिक्त इतर सर्व पदार्थ अर्थात् शरीर आणि संसार यांच्या सत्तेचा अभाव मानल्यानेच होत असते. साधन करण्यासाठी एकांतही उपयोगाचा आहे, परंतु सर्वथा एकांतसेवी साधकाकडून व्यवहारकाळात चूक होणे शक्य आहे. शरीराशी आपलेपणा नसणे हाच वास्तविक एकांत आहे. म्हणून साधकाने वास्तविक एकांताचा उद्देश ठेवून अर्थात् शरीर, इंद्रिये, मन आणि बुद्धीपासून आपली अहंता-ममता नष्ट करून सर्वत्र परिपूर्ण असलेल्या ब्रह्माशी अभिन्नभावाने स्थित रहावे. असे साधकच वास्तविक समबुद्धी आहेत.

गीतेत समबुद्धीचे तात्पर्य, "समदर्शन" आहे, "समवर्तन" नव्हे. पाचव्या अध्यायाच्या अठराव्या श्लोकात भगवंतांनी विद्या आणि विनययुक्त ब्राह्मण, तसेच गाय, हत्ती, कुत्रा आणि चांडाळ ह्या पाच प्राण्यांची नावे घेतली आहेत. ज्यांच्याशी व्यवहारात कोणत्याही रीतीने समता ठेवणे शक्य नाही. तेथेही "**समदर्शिन:**" पद प्रयुक्त झाले आहे. यावरुन तात्पर्य असे निघते की, सर्वांशी व्यवहार कधीही समान होऊ शकत नाही. व्यवहार एकसारखा कोणी करू शकतही नाही आणि होणेही योग्य नव्हे. व्यवहारात भिन्नता असणे आवश्यक आहे. व्यवहारात साधकाची वेगवेगळ्या प्राणी-पदार्थांच्या आकृती व उपयोगितेवर दृष्टी असूनही, वास्तविक त्याची दृष्टी त्या प्राणी पदार्थात परिपूर्ण असलेल्या परमात्म्या-वरच राहत असते. जसे निरनिराळ्या प्रकाराच्या अलंकाराने (सोने या) तत्त्वात काहीही फरक पडत नाही, तसेच वेग-वेगळ्या प्रकाराच्या व्यवहाराने साधकाच्या तत्त्वदृष्टीत काही-ही अंतर येत नाही. साधकाच्या अंत:करणात संपूर्ण प्राण्यां-विषयी समता वास्तव्य करत असते. येथे "**समबुद्धय:**" पदाने त्या आंतरिक समतेकडेच लक्ष वेधले गेले आहे.

सिद्ध महापुरुषांच्या दृष्टीत एका परमात्म्याशिवाय दुसरी सत्ता नसल्याकारणाने ते सदा आणि सर्वत्र "समबुद्धी" च असतात. सिद्ध महापुरुषांची स्वत:सिद्ध स्थितीच साधकासाठी आदर्श असते आणि त्याला अनुसरूनच ते आपले जीवन घडवतात. साधकाच्या दृष्टीत जेवढ्या अंशात परमात्म्याशिवाय इतर पदार्थाविषयी सत्ता राहत असते, तेवढ्याच अंशात त्याच्या बुद्धीत समता राहत नसते. म्हणून साधकाच्या बुद्धितील इतर पदार्थांची स्वतंत्र सत्ता जस-जशी कमी होत जाईल, तस-तशीच त्याच्या बुद्धीत समता येत जाईल.

साधक आपल्या बुद्धीने सर्वत्र परमात्म्याला पाहण्याचा प्रयत्न करत असतो, परंतु सिद्ध महापुरुषांच्या बुद्धीत परमात्मा स्वाभाविकरूपाने, इतका घनतेने परिपूर्ण असतो की, त्यांच्यासाठी परमात्म्याशिवाय काहीच नसते. म्हणून त्यांच्या बुद्धीचा विषय परमात्मा नसतो, तर त्यांची बुद्धीच परमात्म्याने परिपूर्ण झालेली असते. म्हणून ते "**सर्वत्र समबुद्धय:**" असतात.

**ते प्राप्नुवन्ति मामेव**—निर्गुण उपासकांनी कधी असे समजू नये की, निर्गुण तत्त्व वेगळे आहे आणि सगुण तत्त्व वेगळे आहे. म्हणून भगवान् हे स्पष्ट करतात की, निर्गुण ब्रह्म माझ्याहून भिन्न नाही (९। ४, १४। २७). सगुण आणि निर्गुण दोन्ही माझीच स्वरूपे आहेत.

या दोन श्लोकांत भगवंतांनी निर्गुण उपासकांसाठी चार गोष्टी सांगितल्या आहेत (१) निर्गुण तत्त्वाचे स्वरूप काय आहे (२) साधकाची स्थिती कशी असते (३) उपासनेचे स्वरूप कसे आहे आणि (४) साधक काय प्राप्त करून घेतो.

(१) अर्जुनाने याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकाच्या उत्तरार्धात ज्या सगुण तत्त्वासाठी "**अक्षरम्**" आणि "**अव्यक्तम्**" दोन विशेषण देऊन प्रश्न केला होता, त्या तत्त्वाचे विस्तारपूर्वक वर्णन करण्यासाठी भगवंतांनी सहा आणखी विशेषणे अर्थात् एकूण आठ विशेषणे दिली. ज्या

पैकी पाच निषेधात्मक (**अक्षरम्, अनिर्देश्यम्, अव्यक्तम् अचिन्त्यम्** आणि **अचलम्**) तसेच तीन विधेयात्मक (**सर्वत्रगम्, कूटस्थम्** आणि **ध्रुवम्**) विशेषणे आहेत.

(२) सर्व देश, काळ, वस्तू आणि व्यक्तीत असलेल्या परिपूर्ण तत्त्वावर दृष्टी असल्याने निर्गुण उपासकांची सर्वत्र ''समबुद्धी'' असते. देहाभिमान आणि भोगाविषयी वेगळी सत्ता मानल्यामुळेच भोग भोगण्याची इच्छा होत असते आणि भोग भोगले जातात. परंतु या निर्गुण उपासकांच्या दृष्टीत एका परमात्म्या व्यतिरिक्त इतर कोणत्याही वस्तूची वेगळी (स्वतंत्र) सत्ता नसल्यामुळे, त्यांच्या बुद्धीत भोगांचे महत्त्व राहत नसते. म्हणून ते सुगमतेने इंद्रियांचा संयम करतात. सर्वत्र समबुद्धी असल्यामुळे त्यांची सर्व प्राण्यांच्या हिताविषयी रती राहत असते. म्हणून ते ''**सर्वभूतहिते रताः**'' आहेत.

(३) साधकाचे, सर्व काळात त्या निर्गुण तत्त्वाकडे दृष्टी असणे (तत्त्व सम्मुख असणे) हीच ''उपासना'' होय.

(४) भगवान् म्हणतात की, अशा साधकांना ज्या निर्गुण ब्रह्माची प्राप्ती होत असते ती मीच आहे. तात्पर्य, सगुण आणि निर्गुण एकच तत्त्व आहे.

**परिशिष्ट भाव**—भगवंताने येथे ब्रह्माची जी लक्षणे (अचिन्त्य, कूटस्थ, अचल, अक्षर, अव्यक्त इत्यादी) सांगितली आहेत, तीच लक्षणे जीवात्म्याचीही सांगितली आहेत. जसे—'अचिन्त्य' (२। २५), 'कूटस्थ' (१५। १६), 'अचल' (२। २४), 'अक्षर' (५। १५-१८), अव्यक्त (२। २५) इत्यादी. दोन्हींची लक्षणे सारखी सांगण्याचे तात्पर्य हे आहे की, जीव आणि ब्रह्म—दोन्ही स्वरूप एकच आहेत. देहाशी संबंध झाल्यामुळे (अनेक रूपाने) जो 'जीव' आहे, तोच देहाशी संबंध न झाल्यास (एकरूपाने) ब्रह्म आहे अर्थात् जीव केवळ शरीराच्या उपाधीने, देहाभिमानामुळेच वेगळा आहे अन्यथा ते ब्रह्मच आहे. म्हणून ब्रह्माची प्राप्ती झाल्यावर उपासकाला **उपास्याशी** साधर्म्य प्राप्त होते—'**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागता.**' (गीता १४। २).

'**ते प्राप्नुवन्ति मामेव**'—सगुण (गुणसहित) आणि निर्गुण (गुणरहित)—दोन्ही विशेषणात विशेष्य (तत्त्व) तर एकच झाले. म्हणून भगवंताने निर्गुणाच्या उपासकांना सुद्धा आपलीच प्राप्ती सांगितली आहे. भगवंताच्या कथनाचे तात्पर्य हे आहे की, निर्गुण-निराकाररूपही माझेच आहे, माझ्या समग्राहून वेगळे नाही.

'**सर्वभूतहिते रताः**'—जगत्, जीव आणि परमात्मा—तिन्हीही दृष्टींनी आपण सर्व एक आहोत. तात्पर्य, सर्व शरीरे अपरा-प्रकृतीच्या अंतर्गत असल्याने एक आहेत आणि सर्व जीव परा-प्रकृतीच्या अंतर्गत असल्याने एक आहेत. म्हणून जेव्हा साधकाची सर्व प्राण्यात समबुद्धी होते—'**सर्वत्र समबुद्धयः**' आणि तो स्वतःच्या शरीराप्रमाणे सर्व प्राण्यांना आपले मानू लागतो—'**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन**' (गीता ६। ३२), तेव्हा त्याची सर्व प्राण्यांच्या हितात प्रीती होते. कारण संपूर्ण प्राण्यांना आपलेच शरीर मानल्याने तो कोणालाही वाईट समजत नाही, कोणाचेही वाईट इच्छित नाही आणि कोणाचेही वाईट करीत नाही. अशाप्रकारे वाईटाचा त्याग झाल्याने त्याच्याकडून आपोआप दुसऱ्याचे हित होते. एवढेच नव्हे, जसे आपल्या दाताने आपली जीभ चावली गेली तर दातावर क्रोध करून त्याला कोणी पाडून टाकीत नाही, तसेच जो सर्व प्राण्यांना आपले मानतो, त्याचा कोणी अपकार जरी केला तरीही त्याच्या मनात त्याचे वाईट करण्याचा भाव येत नाही '**उमा संत कइ इहइ बड़ाई। मंद करत जो करइ भलाई॥**' (मानस, सुंदर० ४१। ४)

वाईटाचा त्याग झाल्यावर दुसऱ्यांची जी सेवा होते, ती मोठ्यात मोठ्या दान-पुण्यानेही होऊ शकत नाही. म्हणून वाईटाचा त्याग हे चांगुलपणाचे मूळ आहे. ज्याने वाईटाचा त्याग केला आहे, तोच '**सर्वभूतहिते रताः**' होऊ शकतो.

***संबंध**—अर्जुनाच्या प्रश्नाच्या उत्तरात भगवंतांनी दुसऱ्या श्लोकात सगुण उपासकांना श्रेष्ठ म्हटले आणि तीसऱ्या-चौथ्या श्लोकांत निर्गुण-उपासकांना आपली प्राप्ती होत असल्याचे सांगितले. आता दोन्ही उपासकांचे अवांतर भेद तसेच काठिण्य आणि सुगमता याचे वर्णन पुढील तीन श्लोकांत करत आहेत.*

## क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
## अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **अव्यक्तासक्त** | = अव्यक्तात | **क्लेशः** | = कष्ट | **अव्यक्ता** | = अव्यक्त-विषयक |
| **चेतसाम्** | आसक्त चित्त असलेल्या | **अधिकतरः** | = अधिक होतात, | **गतिः** | = गती |
| **तेषाम्** | = त्या साधकांना (आपल्या साधनेत) | **हि** | = कारण | **दुःखम्** | = कठीणतेने |
| | | **देहवद्भि** | = देहाभिमानींच्या द्वारे | **अवाप्यते** | = प्राप्त केली जाते. |

*व्याख्या*—**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम्**—अव्यक्ताविषयी आसक्त असणारे—या विशेषणाने येथे त्या साधकाविषयी म्हटले गेले आहे की, जे निर्गुण उपासनेला श्रेष्ठ तर मानतात, परंतु ज्यांचे चित्त निर्गुण तत्त्वात प्रविष्ट झालेले नाही. तत्त्वात प्रविष्ट होण्यासाठी साधकाचे ठिकाणी तीन गोष्टींची आवश्यकता असते. आवड, विश्वास आणि योग्यता. शास्त्र आणि गुरुजनांकडून निर्गुण तत्त्वाचा महिमा ऐकल्याने ज्यांची (निराकारात आसक्तचित्त असल्याने आणि निर्गुण उपासनेला श्रेष्ठ समजल्याकारणाने) त्याविषयी थोडी फार आवड तर उत्पन्न होते आणि ते विश्वासाने साधन आरंभ सुद्धा करतात परंतु वैराग्याची उणीव आणि देहभिमानामुळे ज्यांचे चित्त तत्त्वात प्रविष्ट होत नाही, अशा साधकासाठी येथे "**अव्यक्तासक्तचेतसाम्**" पदाचा प्रयोग झाला आहे.

भगवंतांनी सहाव्या अध्यायाच्या सत्तावीसाव्या-अठ्ठावीसाव्या श्लोकांत सांगितले आहे की "ब्रह्मभूत" अर्थात् ब्रह्मात अभिन्नभावाने स्थित असलेल्या साधकाला ब्रह्माची प्राप्ती सुखपूर्वक होत असते. परंतु येथे या श्लोकात "**क्लेशः अधिकतरः**" पदांनी हे स्पष्ट केले आहे की, या साधकांचे चित्त ब्रह्मभूत साधकाप्रमाणे निर्गुण तत्त्वात संपूर्णपणे तल्लीन झालेले नसते म्हणून यांना अव्यक्तात "आविष्ट" चित्त असणारा न म्हणता "आसक्त" चित्त असणारा म्हटले गेले आहे. तात्पर्य, या साधकांची आसक्ती तर देहाविषयी असते परंतु अव्यक्ताचा महिमा ऐकून ते निर्गुण उपासनेलाच श्रेष्ठ समजून त्यात आसक्त होतात असे असले तरी आसक्ती देहाविषयीच असते, अव्यक्ताविषयी नव्हे.

तेराव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात "**अव्यक्तम्**" पद प्रकृतीच्या अर्थाने आले आहे, तसेच आणखीही पुष्कळ ठिकाणी ते प्रकृतीसाठींच प्रयुक्त झाले आहे परंतु येथे "**अव्यक्तासक्तचेतसाम्**" पदात "**अव्यक्ता**" चा अर्थ प्रकृती नव्हे तर निर्गुण-निराकार ब्रह्म आहे कारण याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात अर्जुनाने "**त्वाम्**" पदाने सगुण-साकार स्वरूपाच्या आणि '**अव्यक्तम्**' पदाने निर्गुण निराकार स्वरूपाच्या विषयातच प्रश्न केला आहे. उपासनेचा विषयही परमात्माच आहे, प्रकृती नव्हे. कारण प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य तर त्याज्य आहे. म्हणून त्याच प्रश्नाच्या उत्तरात भगवंतांनी "अव्यक्त" पदाचा (व्यक्तरूपाविपरीत) निर्गुण-निराकार स्वरूपाच्या अर्थातच प्रयोग केला आहे. म्हणून येथे प्रकृतीचा प्रसंग नसल्याकारणाने "अव्यक्त" पदाचा अर्थ प्रकृती घेतला जाऊ शकत नाही.

नवव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकात "**अव्यक्तमूर्तिना**" पद सगुण-निराकार स्वरूपाविषयी आले आहे. अशा स्थितीत हा प्रश्न होऊ शकतो की, येथेही "**अव्यक्तासक्तचेतसाम्**" पदाचा अर्थ "सगुण-निराकारात आसक्त चित्त असणारे पुरुष" का घेतला जाऊ नये? परंतु असा अर्थही घेतला जाऊ शकत नाही, कारण याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात अर्जुनाच्या प्रश्नात "**त्वाम्**" पद सगुण-साकारासाठी आणि "**अव्यक्तम्**" पदाबरोबर "**अक्षरम्**" पद निर्गुण- निराकारासाठी आले आहे. ब्रह्म काय आहे? अर्जुनाच्या या प्रश्नाच्या उत्तरात आठव्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात भगवंतांनी सांगितले आहे की, "परम अक्षर ब्रह्म आहे" अर्थात् तेथेही "**अक्षरम्**" पद निर्गुण-निराकारासाठीच आलेले आहे. म्हणून अर्जुनाने "**अव्यक्तम् अक्षरम्**" पदाने ज्या निर्गुण-ब्रह्माच्या विषयात प्रश्न केला होता, त्याच्याच उत्तरात येथे ("अक्षर" विशेषण असल्याने) "अव्यक्त" पदाने निर्गुण-निराकार ब्रह्मच घेतले पाहिजे, सगुण-निराकार नव्हे.

**क्लेशोऽधिकतरः**—या पदाचा भाव असा आहे की, ज्या साधकांचे चित्त निर्गुण तत्त्वात तल्लीन होत नाही, अशा निर्गुण उपासकांना देहाभिमानामुळे आपल्या साधनेत विशेष कष्ट अर्थात् काठिण्य अनुभवाला येते.* गौणरूपाने या पदाचा भाव असा आहे की, साधनेच्या प्रारंभिक अवस्थेपासून अंतिम अवस्थेपर्यंत सर्व निर्गुण-उपासकांना सगुण-उपासनेपेक्षा अधिक कष्ट पडतात.

---

* साधक मुख्यत: दोन प्रकारचे असतात—

एक तर ते साधक आहेत, जे सत्संग, श्रवण आणि शास्त्राध्ययन करून साधनेत प्रवृत्त होतात. त्यांना आपल्या साधनेत अधिक कष्ट होतात.

दुसरे ते साधक आहेत ज्यांची साधनेत स्वाभाविक रुची तसेच संसाराविषयी स्वाभाविक वैराग्य असते. त्यांना आपल्या साधनेत कमी कष्ट होतात.

येथे ही शंका होऊ शकते की, साधक दोनच प्रकारचे का असतात? याचे समाधान असे आहे की, गीतेत योगभ्रष्ट पुरुषाच्या गतीच्या वर्णनात भगवंतांनी दोनच गतीचे वर्णन केले आहे-

(१) काही योगभ्रष्ट पुरुष पुण्यलोकात जातात आणि तेथे भोग भोगून परतल्यावर शुद्ध आचरणाच्या श्रीमंताच्या घरी जन्माला येतात आणि पुन्हा साधनरत होऊन परमात्म्याला प्राप्त होतात. (६।४१,४४-४५)

(२) काही योगभ्रष्ट पुरुष सरळ ज्ञानी योग्यांच्याच कुळात जन्म घेतात आणि नंतर साधन करून परमात्म्याला प्राप्त होतात. अशा कुळात जन्म होणे "दुर्लभतर" आहे (६।४२-४३)

**विशेष गोष्ट**

आता सगुण उपासनेची सुगमता व निर्गुण उपासनेच्या कठिणतेचे विवेचन केले जाते—

## सगुण उपासनेची सुगमता

(१) सगुण उपासनेत उपास्य तत्त्व सगुण-साकार असल्याकारणाने साधकाच्या मन-इंद्रियांना भगवंताचे स्वरूप, नाम, लीला, कथा इत्यादीचा आधार राहतो. भगवत्परायण झाल्याने त्याची मन-इंद्रिये भगवंताच्या स्वरूपाचे, लीलांचे चिंतन, कथा श्रवण, भगवत्सेवा आणि पूजनात अपेक्षेनुसार स्वाभाविक रीतीने लागतात. (८।१४) म्हणून त्याच्याकडून विषय-चिंतनाची शक्यता कमी असते.

(२) सांसारिक आसक्तीच साधनेत क्लेश निर्माण करते परंतु सगुणोपासक ती आसक्ती नष्ट करण्यासाठी भगवंताचा आश्रय घेतो. तो आपल्याठिकाणी भगवंताचेच बळ आहे असे समजतो. मांजरीचे पिल्लू जसे त्याच्या आई-वरच निर्भर राहते तसेच हा साधकही भगवंतावर निर्भर राहत असतो. भगवंतच त्याचा सांभाळ करतात. (९।२२)

**सुनु मुनि तोहि कहउँ सहरोसा।**
**भजहिं जे मोहि तजि सकल भरोसा॥**
**करउँ सदा तिन कै रखवारी।**
**जिमि बालक राखइ महतारी॥**

(मानस ३।४३।२-३)

म्हणून त्याची सांसारिक आसक्ती सुगमतेने समाप्त होते.

(३) अशा उपासकांसाठी गीतेत भगवंतांनी "**नचिरात्**" इत्यादी पदाने शीघ्रतेने आपली प्राप्ती होत असल्याबद्दल सांगितले आहे (१२।७)

(४) सगुण उपासकांच्या अज्ञानरूपी अंधःकाराला भगवंतच नष्ट करून टाकतात. (१०।११)

(५) यांचा उद्धार भगवंत स्वतः करतात (१२।७)

(६) अशा उपासकांत जर एखादा सूक्ष्म दोष राहिलाच तर (भगवंतावर निर्भर असल्याने) सर्वज्ञ भगवान् कृपा करून त्याला नाहीसे करून टाकतात (१८।५८, ६६)

(७) अशा उपासकांची उपासना भगवंताचीच उपासना असते. भगवान् सदा सर्वदा पूर्ण असतातच. म्हणून भगवंताच्या पूर्णतेत किंचितमात्रही संदेह न राहिल्यामुळे त्यांचे ठिकाणी श्रद्धा सुगमतेने होते. श्रद्धा असल्यामुळे ते नित्य-निरंतर भगवत्परायण राहतात. म्हणून भगवंतही या उपासकांना बुद्धियोग प्रदान करतात, ज्यामुळे त्यांना भगवत्प्राप्ती होऊन जाते. (१०।१०)

(८) असे उपासक भगवंताला परम कृपाळू मानतात.

## निर्गुण उसापनेची कठीणता

(१) निर्गुण उपासनेत उपास्य तत्त्व निर्गुण-निराकार असल्याकारणाने साधकाच्या मन-इंद्रियांना कोणताही आधार राहत नाही. आधार नसल्याने तसेच वैराग्याची उणीव असल्यामुळे इंद्रियांकडून विषय चिंतनाची अधिक शक्यता असते.

(२) देहात जितकी अधिक आसक्ती असते, साधनेत तितकेच अधिक क्लेश प्रत्ययाला येतात. निर्गुणोपासक त्याला विवेकद्वारा नष्ट करण्याचा प्रयत्न करतो. विवेकाचा आश्रय घेऊन साधन करत असताना तो आपल्याच साधन-बलाला महत्त्व देत असतो. वानरीचे लहान पिलु जसे (स्व बळावर निर्भर असल्याने) आपल्या आईला घट्ट धरते आणि आपण घट्ट धरल्यानेच आपले रक्षण होते असे समजते, तसेच हा साधक आपल्या साधनाच्या बळावर आपली उन्नती समजतो (१८।५१ ते ५३) म्हणून रामचरित मानसमध्ये भगवंतांनी या साधकाला आपल्या समजदार पुत्राची उपमा दिली आहे—

**मोरे प्रौढ तनय सम ग्यानी।**
**बालक सुत सम दास अमानी॥**

(३।४३।४)

(३) ज्ञानयोग्याकडून उद्देशप्राप्तीच्या प्रसंगात चौथ्या अध्यायाच्या एकोणचाळीसाव्या श्लोकात "**अचिरेण**" पद तत्त्वाज्ञानानंतर शांतीच्या प्राप्तीसाठी आले आहे, तत्त्व ज्ञानाच्या प्राप्तीसाठी नव्हे.

(४) निर्गुण-उपासक तत्त्वज्ञानाची प्राप्ती स्वतः करत असतो (१३।३४)

(५) हे आपला उद्धार (निर्गुण तत्त्वाची प्राप्ती) स्वतः करत असतात (५।२४)

(६) अशा उपासकात जर काही उणीव राहिली तर त्याची जाणीव त्याला विलंबाने होते आणि त्या उणीवेला योग्य रीतीने ओळखणे कठीण जाते. मात्र उणीवेला योग्य रीतीने ओळखल्यानंतर हेही ती उणीव दूर करू शकतात.

(७) चौथ्या अध्यायाच्या चौतीसाव्या आणि तेराव्या अध्यायाच्या सातव्या श्लोकात भगवंतांनी ज्ञानयोगी यांना ज्ञान प्राप्तीसाठी गुरूंच्या उपासनेची आज्ञा दिली आहे. म्हणून निर्गुण उपासनेत गुरूंची आवश्यकताही आहे परंतु गुरूंच्या पूर्णतेचा पत्ता नसल्याने अथवा गुरूंची पूर्णता नसल्याने, स्थिर

म्हणून त्यांच्या कृपेच्या आश्रयाने ते सर्व संकटे पार करून जातात. याच कारणामुळे त्यांचे साधन सुगम होते आणि भगवत्कृपेच्या बळावर ते शीघ्रतेने भगवत्प्राप्ती करून घेतात. (१८।५६-५८)

(९) मनुष्याचे ठिकाणी कर्म करण्याचा अभ्यास तर असतोच. (३।५) म्हणून भक्ताला आपले कर्म भगवंतासाठी करण्यात केवळ भावच बदलावा लागतो, कर्म तर तेच राहतात. म्हणून भगवंतासाठी कर्म केल्याने भक्त कर्मबंधनापासून सुगमतेने मुक्त होतो (१८।४६)

(१०) अंतःकरणात पदार्थांचा आदर असतानाही जर ते प्राण्यांच्या सेवेत त्यांनी उपयोगात आणले तर त्यांना पदार्थांचा त्याग करण्यास कठीण जात नाही सत्पात्रांसाठी पदार्थांच्या त्यागात तर आणखी सुगमता असते. मग भगवंतासाठी पदार्थांचा त्याग तर फारच सुगमतेने होऊ शकतो.

(११) या साधनेत विवेक आणि वैराग्याची इतकी आवश्यकता नसते जितकी प्रेम आणि विश्वासाची असते. जसे कौरवांविषयी द्वेषवृत्ती असूनही द्रौपदीने हाक मारताच भगवान् प्रगट होत होते.* कारण ती भगवंताना आपले समजत होती. भगवान् तर आपल्याविषयीच्या भक्ताच्या प्रेम आणि विश्वासालाच पाहतात, त्यांच्या दोषांना नव्हे! भगवंताशी आपलेपणाचा संबंध जोडणे तितके कठीण नाही (कारण भगवंताकडून आपलेपणा स्वतःसिद्ध आहे) जितके पात्र होणे कठीण आहे.

श्रद्धा होणे कठीण जाते तसेच साधनेच्या सफलतेतही विलंबाची संभावना राहते.

(८) असे उपासक उपास्य तत्त्वाला निर्गुण, निराकार, आणि उदासीन मानतात. म्हणून त्यांना भगवंताच्या कृपेचा तसा अनुभव येत नाही. ते तत्त्वप्राप्तीत येणाऱ्या विघ्नांना आपल्या साधनेच्या बळावरच दूर करण्यात कठीणतेचा अनुभव करतात. फलस्वरूप तत्त्वाच्या प्राप्तीतही त्यांना विलंब होऊ शकतो.

(९) ज्ञानयोगी आपल्या क्रियांना सिद्धांताच्या दृष्टीने प्रकृतीला अर्पण करत असतो. परंतु पूर्ण विवेक जागृत झाल्यावरच त्याच्या क्रिया प्रकृतीला अर्पण होऊ शकतात. जर विवेकाची थोडीही उणीव राहिली तरी क्रिया प्रकृतीला अर्पण होणार नाहीत आणि साधक कर्तृत्वाभिमान असल्यामुळे कर्मबंधनात सापडला जाईल.

(१०) जोपर्यंत साधकाच्या चित्तात पदार्थांचा थोडाही आदर तसेच आपले म्हणविले जाणारे शरीर, आणि नावाविषयी अहंता ममता असते, तोपर्यंत त्याला पदार्थांना मायामय समजून त्यांचा त्याग करणे कठीण जाते.

(११) हा साधक पात्र झाल्यावरच तत्त्वाला, प्राप्त करू शकेल. पात्र होण्यासाठी विवेक आणि तीव्र वैराग्याची आवश्यकता राहील, आसक्ती राहत असताना ते प्राप्त करणे कठीण जाते.

---

**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते**— "देही", "देहभृत्" इत्यादी पदांचा अर्थ साधारणपणे "देहधारी पुरुष" घेतला जातो. प्रसंगानुसार यांचा अर्थ "जीव" आणि "आत्मा" ही घेतला जातो. येथे "**देहवद्भिः**" †पदाचा अर्थ "देहाभिमानी मनुष्य" घेतला पाहिजे, कारण निर्गुण उपासकांसाठी याच श्लोकाच्या पूर्वार्धात "**अव्यक्तासक्तचेतसाम्**" पद आले आहे. त्यावरुन असे प्रतीत होते की, ते निर्गुण उपासनेला तर श्रेष्ठ मानतात परंतु त्यांचे चित्त देहाभिमानामुळे निर्गुण तत्त्वात प्रविष्ट झालेले नसते. देहाभिमानामुळेच त्यांना साधनेत अधिक क्लेश होतात.

निर्गुणोपासनेत देहाभिमानच मुख्य बाधक आहे "**देहाभिमानिनि सर्वे दोषाः प्रादुर्भवन्ति**" या बाधेकडे लक्ष वेधण्यासाठीच भगवंतांनी "**देहवद्भिः**" पद दिले आहे हा देहाभिमान नष्ट करण्यासाठी (अर्जुनाने न विचारताही) भगवंतांनी तेरावा आणि चौदावा अध्याय सांगितला आहे. त्यातही तेराव्या अध्यायाचा प्रथम श्लोक देहाभिमान मिटविण्यासाठीच सांगितला गेला आहे.

ब्रह्माच्या निर्गुण-निराकार स्वरूपाच्या प्राप्तीला येथे "**अव्यक्ता गतिः**" म्हटले गेले आहे. साधारण मनुष्याची स्थिती व्यक्त अर्थात् देहाच्या ठिकाणी असते. म्हणून त्यांना अव्यक्तात स्थित होण्यात कठीणतेचा अनुभव येतो. जर साधकाने स्वतः ला देहधारी समजले नाही तर त्याची अव्यक्ताचे ठिकाणी सुगमतेने आणि शीघ्रतेने स्थिती होऊ शकते.

---

* ही गोष्ट त्या भक्तांची आहे ज्यांनी केलेल्या केवळ स्मरणानेच भगवान् प्रकट होतात, सर्व साधारण लोकांची नव्हे. जो भक्त सर्वथा भगवंतावर निर्भर असतो, तसेच ज्याची भगवंताशी इतकी प्रगाढ आत्मीयता असते की, केवळ स्मरणाने भगवान् प्रकट होतात, त्यांचे दोष नष्ट करण्याची जबाबदारी भगवंतावर येऊन पडते.

† येथे "देह" शब्दात "भूमनिन्दाप्रशंसासु नित्ययोगेऽतिशायने। संसर्गेऽस्ति विवक्षायां भवन्ति मतुबादयः॥" या कारिकेनुसार संसर्ग अर्थामध्ये "तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप्" (५।२।९४), या पाणिनिसूत्राप्रमाणे "मतुप्" प्रत्यय केला गेला आहे. "देहवद्भिः" पदाचा अर्थ आहे—ज्यांचा देहाशी दृढतापूर्वक संबंध मानलेला आहे, असे पुरुष.

सहाव्या अध्यायाच्या सत्तावीसाव्या श्लोकात "ब्रह्मभूत" झाल्यास सुखपूर्वक ब्रह्मप्राप्ती सांगितली गेली आहे. तर येथे "देहभूत" असल्यामुळे दुःखपूर्वक ब्रह्मप्राप्ती सांगितली गेली आहे.

**परिशिष्ट भाव**—निर्गुणोपासनेत जो देहसहित आहे, तो '**उपासक**' (जीव) आहे आणि जो देहरहित आहे तो '**उपास्य**' (ब्रह्म) आहे. देहाशी मानलेला संबंधच जीव आणि ब्रह्माच्या ऐक्यात मुख्य बाधक आहे. म्हणून देहाभिमान्यासाठी निर्गुणोपासनेची सिद्धी कठीणतेने आणि उशीरा होते. परंतु सगुणोपासनेत भगवंताची विमुखता बाधक आहे, देहाभिमान बाधक नाही. म्हणून सगुणोपासक संसाराशी विन्मुख होऊन भगवंताला सन्मुख होतो, साधनेच्या आश्रित न राहता भगवंताच्या आश्रित होतो. म्हणून भगवान् कृपा करून त्याचा शीघ्र उद्धार करतात (गीता १२। ७, ८। १४) ही सगुणोपासनेची विलक्षणता आहे.

सगुणोपासनेत भक्त जगताला मिथ्या मानून त्याच्या त्यागावर जोर देत नाही, कारण त्याच्या दृष्टीत जड-चेतन, सत-असत् सर्व काही भगवान्च असतात—'**सदसच्चाहमर्जुन**' (गीता ९। १९). म्हणून सगुणाची उपासना ही समग्राची उपासना आहे. गीतेत सगुणाला समग्र मानले आहे आणि ब्रह्म, जीव, कर्म, आधिभूत, आधिदैव आणि आधियज्ञ—या सर्वांना समग्र भगवंताच्याच अंतर्गत मानले आहे (गीता ७। २९-३०). म्हणून गीतेचे चिंतन केल्यावर असे प्रतीत होते की, निर्गुणोपासना (ब्रह्माची उपासना) समग्र भगवंताच्या एका अंगाची उपासना आहे आणि सगुणोपासना स्वतः समग्र भगवंताची उपासना आहे—'**त्वां पर्युपासते**' (गीता १२। १), '**मां ध्यायन्त उपासते**' (१२। ६).

जो समग्र भगवंताच्या एका अंगाची उपासना करतो, त्यालाही शेवटी समग्राची प्राप्ती होते—'**ते प्राप्नुवन्ति मामेव**' (गीता १२। ४), '**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम्**' (१८। ५५). म्हणून ज्याला निर्गुण आवडते त्याने निर्गुणाची उपासना करावी, परंतु त्याने निर्गुणाचा आग्रह ठेवून सगुणाचा तिरस्कार करू नये. सगुणाचा तिरस्कार, निंदा, खंडन करणे हे निर्गुणोपासकासाठी फार घातक आहे अर्थात् त्याची साधना सिद्ध होण्यात बाधक आहे. कारण अपरा-प्रकृती भगवंताची आहे. म्हणून तिची निंदा करण्याने ती निंदा भगवंताची होते. गुणांचे खंडन करण्याने गुणांची सत्ता स्वीकृत होते, जी बाधक असते, कारण सत्ता स्वीकृत केल्याशिवाय साधक तिचे निराकरण कसा करू शकेल? म्हणून साधक जर दुसऱ्याची निंदा, तिरस्कार न करता तत्परतेने आपल्या साधनेत रत राहीला तर पुढे सर्व साधक एक होतील. कारण तत्त्व एकच आहे.* सगुणाची उपेक्षा करण्याने साधक मुक्त तर होऊ शकतो, परंतु मतभेद समाप्त होऊ शकत नाही. परंतु सगुणाची उपेक्षा न राहिल्यास मतभेदही राहत नाही आणि साधकाला समग्राची प्राप्ती होते.

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि सन्न्यस्य मत्पराः।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते॥ ६॥**
**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्।**
**भवामि नचिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम्॥ ७॥**

**तु** = परंतु
**ये** = जे
**सर्वाणि** = संपूर्ण
**कर्माणि** = कर्मांना
**मयि** = मला
**सन्न्यस्य** = अर्पण करून (आणि)
**मत्पराः** = माझ्या परायण होऊन
**अनन्येन** = अनन्य-
**योगेन** = योगाने (संबंधाने)
**माम्, एव** = माझेच
**ध्यायन्तः** = ध्यान करीत
**उपासते** = (माझी) उपासना करतात,
**पार्थ** = हे पार्थ!
**मयि** = माझ्यात
**आवेशित-** = चित्त आविष्ट
**चेतसाम्** असलेल्या
**तेषाम्** = त्या भक्तांचा
**अहम्** = मी
**मृत्युसंसार-** = मृत्युरूप संसार-
**सागरात्** सागरातून
**नचिरात्** = लवकरच
**समुद्धर्ता** = उद्धार करणारा
**भवामि** = होतो.

**व्याख्या**—[अकराव्या अध्यायाच्या पंचावन्नाव्या श्लोकात भगवंतांनी अनन्यभक्ताच्या लक्षणात तीन विधेयात्मक ("**मत्कर्मकृत्**", "**मत्परमः**", आणि "**मद्भक्तः**") आणि दोन निषेधात्मक ("**सङ्गवर्जितः**" आणि "**निर्वैरः**") पद दिले होते. त्याच पदांचा संकेत या श्लोकात अशा प्रकाराने केला गेला आहे—

* वदन्ति तत्तत्त्वविदस्तत्त्वं यज्ज्ञानमद्वयम्।
ब्रह्मेति परमात्मेति भगवानिति शब्द्यते॥ (श्रीमद्भा० १। २। ११)
'तत्त्वज्ञ महापुरुष त्या ज्ञानस्वरूप आणि अद्वितीय तत्त्वालाच ब्रह्म, परमात्मा आणि भगवान—या तीन नावाने संबोधतात.'

(१) "**सर्वाणि कर्माणि मयि सन्न्यस्य**" पदांनी "**मत्कर्मकृत्**" या पदाकडे लक्ष वेधते.

(२) "**मत्पराः**" पदाने "**मत्परमः**" चा संकेत आहे.

(३) "**अनन्येनैव योगेन**" पदांत "**मद्भक्तः**" पदाचा संकेत आहे.

(४) भगवंतातच अनन्यतेने लागून राहिल्याने त्यांची कुठेही आसक्ती नसते म्हणून ते "**सङ्गवर्जितः**" आहेत.

(५) कुठेही आसक्ती नसल्याकारणाने, त्यांच्या मनात कोणाविषयीही वैर, द्वेष, क्रोध, इत्यादीचा भाव राहत नसतो. म्हणून "**निर्वैरः**" पदाचा भावही याच्या अंतर्गत येतो. परंतु भगवंतांनी याला महत्त्व देण्यासाठी, पुढे तेराव्या श्लोकात सिद्ध भक्तांच्या लक्षणात सर्वात प्रथम "**अद्वेष्टा**" पदाचा प्रयोग केला आहे. म्हणून साधकाने कोणाविषयी किंचिन्मात्र-ही द्वेष ठेवू नये.]

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि सन्न्यस्य**—आता येथून निर्गुणोपासनेपेक्षा सगुणोपासनेची सुगमता दाखविण्यासाठी "**तु**" पदाने प्रकरण भेद करत आहेत.

जरी "**कर्माणि**" पद स्वतः च बहुवचनात असल्याने संपूर्ण कर्माचा बोध करविते, तरीपण याबरोबर "**सर्वाणि**" विशेषण देऊन मन, वाणी, शरीराने होणाऱ्या सर्व लौकिक (शरीर-निर्वाह आणि आजीविकासंबंधी) तसेच पारमार्थिक (जप, ध्यानसंबंधी) शास्त्रविहित कर्मांचा समावेश केला गेला आहे. (९।२७)

येथे "**मयि सन्न्यस्य**" पदांनी भगवंताचा आशय क्रियांचा स्वरूपाने त्याग करण्याचा नव्हे. कारण एका दृष्टीने तर स्वरूपाने कर्माचा त्याग संभवत नाही (३।५, १८।११), दुसरी गोष्ट, जर सगुणोपासक मोहाने शास्त्रविहित क्रियांचा स्वरूपाने त्याग करीत असेल, तर त्याचा तो त्याग "तामस त्याग" होईल. (१८।७) आणि जर दुःखरूप समजून शारीरिक क्लेशाच्या भयाने, तो त्याचा त्याग करत असेल तर तो त्याग राजस होईल (१८।८). म्हणून या रीतीने त्याग झाल्यावर कर्माशी संबंध सुटणार नाही. कर्मबंधनातून मुक्त होण्यासाठी हे आवश्यक आहे की, साधकाने कर्माविषयी असलेल्या ममता, आसक्ती आणि फलेच्छेचा त्याग करावा; कारण ममता, आसक्ती आणि फलेच्छेने केली गेलेली कर्मच बांधणारी असतात.

जर साधकाचा उद्देश भगवत्प्राप्ती असेल, तर तो पदार्थांची इच्छा करत नाही आणि स्वतः आपल्याला भगवंताचा समजत असल्यामुळे त्याची शरीरावरील ममता कमी होऊन, एका भगवंताचेच ठिकाणी त्याची भक्ती दृढ होते. स्वतः भगवंताना अर्पण झाल्यामुळे त्याची संपूर्ण कर्मही भगवदर्पित होत असतात.

भगवंतासाठी कर्म करण्याविषयीचे अनेक प्रकार आहेत ज्यांना गीतेत "मदर्पण कर्म", "मदर्थ कर्म" आणि "मत्कर्म" नावाने म्हटले गेले आहे.

(१) "मदर्पण कर्म"—त्या कर्मांना म्हटले जाते ज्यांचा उद्देश पूर्वी कोणताही का असेना, परंतु कर्म करते वेळी अथवा कर्म केल्यानंतर ती भगवंताला अर्पण केली जातात.

(२) मदर्थ कर्म—ती कर्म आहेत, जी आरंभापासून-च भगवंतासाठी केली जातात, अथवा जी भगवत्सेवारूपी असतात. भगवत्प्राप्तीसाठी कर्म करणे, भगवंताची आज्ञा समजून कर्म करणे आणि भगवंताच्या प्रसन्नतेसाठी कर्म करणे—ही सर्व कर्म भगवदर्थ कर्म आहेत.

(३) भगवंताचेच काम समजून संपूर्ण लौकिक (व्यापार नोकरी इत्यादी) आणि भगवत्संबंधी (जप, ध्यान इत्यादी) कर्म करणे "मत्कर्म" आहे.

वास्तविक कर्म कशीही केली जावोत, त्यांचा एकमात्र उद्देश भगवत्प्राप्तीच असला पाहिजे.

उपर्युक्त तिन्हीही प्रकारांनी (मदर्पण कर्म, मदर्थ कर्म, मत्कर्म) सिद्धी प्राप्त करणाऱ्या साधकाचा कर्मांशी किंचिन्मात्र-ही संबंध राहत नाही; कारण त्याचेठिकाणी फलेच्छा, कर्तृत्वाभिमान नसतो आणि पदार्थांविषयी आणि शरीर, मन, बुद्धी तसेच इंद्रियाविषयीही ममता राहत नसते. जर कर्म करण्याचे साधन शरीर, मन, बुद्धी इत्यादीही आपली नाहीत, तर मग कर्माविषयी ममता होऊच कशी शकते ? अशा प्रकारे कर्मापासून संपूर्णपणे मुक्त होणेच वास्तविक समर्पण आहे. सिद्ध पुरुषांच्या क्रिया आपोआपच समर्पण होत असतात आणि साधक पूर्ण समर्पणाचा उद्देश ठेवून तसेच कर्म करण्याचा प्रयत्न करत असतो.

जसे भक्तियोगी आपल्या क्रियांना भगवंताला अर्पण करून कर्म बंधनापासून मुक्त होतो, तसेच ज्ञानयोगी क्रियांना प्रकृतीकडून होत असलेल्या समजून आपल्याला त्यांच्याशी संपूर्णपणे असंग आणि निर्लिप्त अनुभव करून कर्मबंधनापासून मुक्त होतो.

**मत्पराः**—परायण होणे म्हणजे भगवंताला परम पूज्य आणि सर्वश्रेष्ठ समजून त्यांच्याशी समर्पणभावाने राहणे. संपूर्णपणे भगवत्परायण झाल्याने सगुण-उपासक स्वतः आपल्याला भगवंताचे यंत्र समजत असतो. म्हणून शुभ क्रियांना तो भगवंताकडून करविली गेलेली समजत असतो, तसेच संसाराचा उद्देश नसल्यामुळे त्याचेठिकाणी भोगा-विषयी कामना राहत नसते आणि कामना नसल्यामुळे त्याचे

कडून अशुभ क्रिया घडतच नाहीत.

**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते**—या पदांत इष्ट-संबंधी व उपाय-संबंधी दोन्ही प्रकारच्या अनन्यतेचा संकेत आहे; अर्थात त्या भक्तांचे इष्ट भगवानच आहेत. त्यांच्याशिवाय इतर कोणते साध्य त्यांच्या दृष्टीत नसतेच आणि त्यांच्या प्राप्ती-साठी आश्रय देखील त्यांचाच असतो. ते भगवत्कृपेनेच साधनाची सिद्धी मानतात, आपल्या पुरुषार्थाच्या अथवा साधनाच्या बळावर नव्हे. ते उपाय देखील भगवंतालाच समजतात आणि उपेय सुद्धा त्यांनाच समजतात. ते एका भगवंताचाच उद्देश, ध्येय ठेवून उपासना अर्थात् जप, ध्यान, कीर्तन इत्यादी करत असतात.

**'मेरे तो गिरधर गोपाल, दूसरो न कोई'**—अशा प्रकारे केवळ भगवंताशी संबंध मानणे 'अनन्ययोग' आहे.

**तेषामहं समुद्धर्ता............मय्यावेशित चेतसाम्**—ज्या साधकांचे लक्ष्य, उद्देश, ध्येय, भगवंतच झालेले आहेत आणि ज्यांनी अनन्यप्रेमपूर्वक आपले चित्त भगवंतातच स्थिर केले आहे तसेच स्वत:ही भगवंतातच लागलेले आहेत त्यांच्याचसाठी येथे "**मय्यावेशितचेतसाम्**" पद आले आहे.

जसे समुद्रात पाणीच पाणी असते तसे संसारात मृत्यूच मृत्यू आहे. संसारात उत्पन्न होणारी कोणतीही वस्तू अशी नाही की जी कधी क्षणभरासाठीही मृत्यूच्या तडाख्यातून वाचत आहे. अर्थात् उत्पन्न होणारी प्रत्येक वस्तू प्रत्येक क्षणी मृत्यूकडेच जात आहे. म्हणून संसाराला "मृत्युसंसार-सागर" म्हटले गेले आहे.

मनुष्यामध्ये अनुकूल आणि प्रतिकूल—दोन्ही वृत्ती राहत असतात. संसाराची रचना, परिस्थिती तसेच प्राणी पदार्थांविषयी असलेल्या अनुकूल-प्रतिकूल वृत्ती, राग-द्वेष उत्पन्न करून मनुष्याला संसार बंधनात टाकतात (७। २७) येथपर्यंत दिसते की, साधकसुद्धा सांप्रदाय-विशेष आणि संत-विशेष यांच्या विषयीही अनुकूल-प्रतिकूल भावना करून राग-द्वेषाचे शिकार बनतात. त्यामुळे ते संसार- समुद्रातून लवकर तरून जाऊ शकत नाहीत. कारण तत्त्वाच्या इच्छुक साधकाला सांप्रदायिकतेचा पक्षपात फार बाधक असतो. सांप्रदायाचा मोहपूर्वक आग्रह, मनुष्याला बंधनात टाकतो. म्हणून गीतेत भगवंतांनी ठिक-ठिकाणी या द्वन्द्वापासून (राग आणि द्वेष) मुक्त होण्यासाठी विशेष भर दिला आहे.*

जर साधकभक्ताने आपल्या सर्व अनुकूलतेचा विषय भगवंताला केले अर्थात् केवळ भगवंताशीच अनन्यप्रेमाचा संबंध जोडला आणि सर्व प्रतिकूलता संसाराच्या माथी मारली अर्थात् संसाराची सेवा करून अनुकूलतेच्या इच्छेला विमुख झाला, तर तो या संसार-बंधनातून फारच लवकर मुक्त होऊ शकतो. संसाराविषयी अनुकूल आणि प्रतिकूल वृत्ती उत्पन्न होणे, म्हणजेच संसार-बंधन आहे.

भगवंताचा असा एक सामान्य नियम आहे की, जो ज्या भावाने त्यांना शरण होतो, त्याच भावाने भगवंतही त्याला आश्रय देतात—"**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्**" (४। ११) . म्हणून ते म्हणतात की, जरी मी सर्वांमध्ये समभावाने स्थित आहे—"**समोऽहं सर्वभूतेषु**" (९।२९) तरीपण ज्यांचा मी एकमात्र प्रिय आहे, जे माझ्या-साठीच सर्व कर्म करत असतात आणि मत्परायण होऊन नित्य-निरंतर माझ्याच ध्यान, जप, चिंतनात लागून राहतात अशा भक्तांचा मी स्वत: मृत्यु-संसारसागरातून फारच लवकर आणि योग्य रीतीने उद्धार करतो.†

**परिशिष्ट भाव**—सहाव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात भगवंताने सर्व प्रकारच्या सामान्य साधकांसाठी स्वत:च स्वत:चा उद्धार करण्याविषयी म्हटले होते—'**उद्धरेदात्मनात्मानम्**' आणि येथे म्हणतात की, भक्तांचा उद्धार मी करतो—'**तेषामहं समुद्धर्ता**'. याचे तात्पर्य असे आहे की, प्रत्येक साधक आरंभी स्वत:च साधनेत लागतो. साधनेत लागणाऱ्यात सुद्धा जे साधक भगवंताच्या आश्रित होतात, त्यांचा उद्धार भगवान् करतात. कारण त्यांचा भगवंतावरच भरवसा असतो की, माझा उद्धार तेच करतील. तो आपल्या उद्धाराची चिंता न करता केवळ भगवंताच्या भजनातच लागून राहतो. त्याचे साधन आणि साध्य भगवान्च असतात. परंतु ज्ञानमार्गाचा पथिक आपला उद्धार स्वत:च करतो.

स्वरूपबोध झाल्यावर भक्ती प्राप्त होईल—हा काही नियम नाही. परंतु भक्ती प्राप्त झाल्यावर स्वरूपबोधही होतो. म्हणून भगवंताने म्हटले आहे—

---

* उदाहरणार्थ-"निर्द्वन्द्वः" (२। ४५), "निर्द्वन्द्वो हि महाबाहो" (५। ३), "ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ताः" (७। २८), "द्वन्द्वैर्विमुक्ताः" (१५। ५), "न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते" (१८। १०), रागद्वेषौ व्युदस्य च (१८। ५१)

† "समुद्धर्ता भवामि" पदांच्या अंतर्गत भगवंताचे हे भावही समजून घ्यावे की, तो सगुणोपासक माझ्या कृपेने साधनेच्या सर्व विघ्न-बाधांना पार करून माझ्या कृपेनेच माझी प्राप्ती करून घेतो. (१८। ५६-५८); साधनेच्या उणीवेला पूर्ण करून मी त्याला आपली प्राप्ती करून देतो (९। २२), त्यांच्या अंत:करणात स्थित असलेला, मी तत्त्वज्ञानाने त्यांच्या अज्ञानजनित अंध:काराचा नाश करतो (१०। ११) आणि त्यांना संपूर्ण पापापासून मुक्त करतो (१८। ६६)

**मम दरसन फल परम अनूपा। जीव पाव निज सहज सरूपा॥**

(मानस, अरण्य० ३६।५)

भगवान् आपल्या भक्तांना कर्मयोग आणि ज्ञानयोग—दोन्ही योग प्रदान करतात (गीता १०।१०-११). कारण भगवंताचे स्वरूप समग्र आहे.

देहाभिमानामुळे ज्ञानमार्गाच्या साधकाचे चित्त अव्यक्तात 'आसक्त' होते—'**अव्यक्तासक्तचेतसाम्**' (गीता १२।५). परंतु भक्ताचे चित्त भगवंतात 'आविष्ट' असते—'**मय्यावेशितचेतसाम्**'. ज्ञानात विवेक मुख्य आहे, भक्तीत विश्वास मुख्य आहे. ज्ञानात अपरा-प्रकृती त्याज्य असते, भक्तीत ती भगवत्स्वरूप असते. '**मेरे तो गिरधर गोपाल, दूसरो न कोई**'—अशाप्रकारे केवळ भगवंताशीच संबंध मानणे "अनन्ययोग" आहे.

***संबंध—*** *भगवंतांनी दुसऱ्या श्लोकात सगुण उपासकांना श्रेष्ठ योगी म्हटले, तसेच सहाव्या आणि सातव्या श्लोकांत हे सांगितले की, अशा भक्तांचा मी लवकर उद्धार करतो. म्हणून आता भगवान् अर्जुनाला असा श्रेष्ठ योगी होण्यासाठी प्रथम आठव्या श्लोकात समर्पणयोगरूप साधनेचे वर्णन करून मग नवव्या, दहाव्या आणि अकराव्या श्लोकात क्रमाने अभ्यासयोग, भगवदर्थ कर्म आणि सर्वकर्मफलत्यागरूपी साधनेचे वर्णन करतात.*

## मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय।
## निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः॥८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मयि** | = (तू) माझ्यात | **बुद्धिम्** | = बुद्धीला | **मयि, एव** | = माझ्यातच |
| **मनः** | = मनाला | **निवेशय** | = प्रविष्ट कर | **निवसिष्यसि** | = निवास करशील— |
| **आधत्स्व** | = स्थापन कर (आणि) | **अतः** | = त्या- | **संशयः, न** | = (यात) काही संशय नाही. |
| **मयि, एव** | = माझ्यातच | **ऊर्ध्वम्** | = नंतर (तू) | | |

*व्याख्या—* **मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय**—भगवंताच्या मताने, ज्यांना भगवंताशी आपल्या नित्ययोगाचा अनुभव झाला आहे, तेच पुरुष उत्तम योगवेत्ते आहेत. सर्व साधकांना उत्तम योगवेत्ता बनविण्याच्या उद्देशाने भगवान् अर्जुनाला निमित्त करून अशी आज्ञा करतात की, मला परमेश्वरालाच परम श्रेष्ठ आणि परम प्रापणीय समजून बुद्धीला माझ्यात लाव आणि मलाच आपला परम प्रियतम मानून मनाला माझ्यात लाव.

भगवंतात आपली स्वतःसिद्ध स्थिती (नित्ययोग) असते. परंतु भगवंताचे ठिकाणी मन, बुद्धी स्थिर न लागल्यामुळे आपल्याला भगवंताशी आपल्या स्वतःसिद्ध नित्य संबंधाचा अनुभव येत नाही. म्हणून भगवान् म्हणतात की, मन, बुद्धीला माझ्यात लाव. मग तू माझ्यातच निवास करशील (जो नित्ययोग पूर्वीपासूनच आहे) अर्थात् तुला माझ्या ठिकाणी आपल्या स्वतःसिद्ध स्थितीचा अनुभव येईल.

मन, बुद्धी स्थिर करण्याचे तात्पर्य, आत्तापर्यंत मनुष्याने, ज्या मनाद्वारा संसाराविषयी ममता, आसक्ती, सुख-भोगाची इच्छा, आशा इत्यादीच्या कारणाने वारंवार संसाराचे-च चिंतन केले आहे आणि बुद्धीने संसारातच चांगल्या वाईटाचा निश्चय केला आहे, त्या मनाला संसारापासून हटवून भगवंतातच लावावे. तसेच बुद्धीद्वारा दृढतेने असा निश्चय करावा की, "मी केवळ भगवंताचा आहे आणि केवळ भगवंतच माझे आहेत, तसेच माझ्यासाठी सर्वोपरी, सर्वश्रेष्ठ आणि परम प्रापणीय भगवानच आहेत." असा दृढ निश्चय केल्याने संसाराचे चिंतन आणि महत्त्व समाप्त होईल आणि एका भगवंताशीच संबंध राहील. हेच मन, बुद्धीचे भगवंतात लागणे आहे.

मन-बुद्धी लावण्यातही बुद्धीचे लावणे मुख्य आहे. कोणत्याही विषयात प्रथम बुद्धीचाच निश्चय होत असतो आणि मग बुद्धीच्या त्या निश्चयाला मन स्वीकार करत असते. साधन करण्यातही प्रथम (उद्देश ठरवण्यात) बुद्धीची प्रधानता असते मग मनाची प्रधानता असते. ज्या पुरुषांचे ध्येय परमात्मप्राप्ती नसते, त्यांचे मन-बुद्धी सुद्धा, ते ज्या विषयाकडे लावू इच्छितील त्या विषयात लावू शकतात. त्या विषयामध्ये मन-बुद्धी लागल्याने त्यांना सिद्धी तर प्राप्त होऊ शकतात परंतु (भगवत्प्राप्तीचा उद्देश नसल्यामुळे) भगवत्प्राप्ती होऊ शकत नाही. म्हणून साधकाने बुद्धीचा असा निश्चय करावा की "मला भगवत्प्राप्तीच करावयाची आहे". या निश्चयात फार मोठी शक्ती असते. अशी निश्चयात्मिका बुद्धी होण्यात सर्वात मोठी बाधा भोग आणि संग्रहाचे सुख घेणे ही आहे. सुखाच्या

आशेनेच मनुष्याच्या वृत्ती धन, मान, मोठेपणा इत्यादी मिळविण्याचा उद्देश बनत असतात, म्हणून त्याची वृत्ती पुष्कळ भेद असणारी आणि अनंत होते (२। ४१). परंतु जर भगवत्प्राप्तीचाच एकमेव निश्चय झाला असेल तर या निश्चयात एवढी पवित्रता आणि शक्ती असते की, दुराचाराती दुराचारी पुरुषालाही भगवान् साधू मानण्यासाठी तयार होतात. या केवळ निश्चयाच्या प्रभावाने तो लवकरच धर्मात्मा होतो आणि सदा राहणाऱ्या परमशांतीला प्राप्त करून घेतो. (९।३०-३१)

''मी भगवंताचाच आहे आणि भगवंतच माझे आहेत'' असा निश्चय (साधकाच्या दृष्टीत) बुद्धीत झालेला प्रतीत होत असतो परंतु वास्तविक असे नसते. बुद्धीत असा निश्चय दिसत असला तरी साधकाला याचा पत्ता नसतो की, तो ''स्वयं'' पूर्वीपासूनच भगवंतात स्थित आहे. मग त्याने ही गोष्ट जाणली नाही तरीही वास्तविकता अशी आहे. ''स्वयं'' भगवंतात स्थित असण्याची ओळख अशी आहे की, या संबंधाची कधी विस्मृती होत नाही. जर ही केवळ बुद्धीचीच गोष्ट असती तर, तिचे विस्मरणही होऊ शकते परंतु ''मी'' पणाला साधक कधीही विसरत नाही. जसे ''मी विवाहित आहे'' हा ''मी'' पणाचा निश्चय आहे, बुद्धीचा नव्हे. म्हणून मनुष्य ही गोष्ट कधी विसरत नाही. जर कोणी असा निश्चय केला की, 'मी अमुक गुरूंचा शिष्य आहे' तर, या संबंधासाठी कोणता अभ्यास न करतानाही, हा निश्चय त्याच्या अंत:करणात अटळ राहत असतो. स्मृतीत तर स्मृती राहतच असते, विस्मृतीतही संबंधाच्या स्मृतीचा अभाव होत नाही. कारण संबंधाचा निश्चय ''मी'' पणात असतो. अशा प्रकारे संसारात मानलेला संबंध सुद्धा जर स्मृती आणि विस्मृती दोन्ही अवस्थेत अटळ राहत असतो, तर भगवंताशी नेहमीचाच जो नित्यसंबंध आहे, त्याची विस्मृती कशी होऊ शकते? म्हणून ''मी भगवंताचाच आहे आणि भगवंतच माझे आहेत'' अशा प्रकारे ''मी'' पणा (स्वयं) भगवंतात लागल्याने मन-बुद्धीही आपोआप भगवंतात लागतात.

मन-बुद्धीत अंत:करण चतुष्टयाचा अंतर्भाव आहे. मनाच्या अंतर्गत चित्ताचा आणि बुद्धीच्या अंतर्गत अहंकाराचा अंतर्भाव आहे. मन-बुद्धी भगवंतात लागल्याने अहंकाराचा आधार ''स्वयं'' भगवंतात लागेल आणि त्याचा परिणाम म्हणून ''मी भगवंताचाच आहे आणि भगवंतच माझे आहेत'' असा भाव उत्पन्न होईल. या भावात निर्विकल्प स्थिती झाल्यावर ''मी'' पणा भगवंतात लीन होऊन जाईल.

## विशेष गोष्ट

साधारणपणे आपले स्वरूप (''मी'' पणाचा आधार ''स्व'') मन, बुद्धी, शरीर इत्यादीबरोबर असल्याचे दिसते. परंतु वास्तविक यांच्याबरोबर ते नसतेच. सामान्यरूपाने प्रत्येक व्यक्ती हा अनुभव करू शकतो की; बालपणापासून अतापर्यंत शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी सर्वचे सर्व बदलून गेले परंतु मी तोच आहे. म्हणून ''मी बदलणारा नाही'' ही गोष्ट आजपासूनच दृढतेने मानली पाहिजे (साधारणपणे मनुष्य बुद्धीनेच समजून घेण्याचा प्रयत्न करत असतो, परंतु येथे ''स्व'' ने जाणून घेण्याची गोष्ट आहे).

विचार करा—एकीकडे आपले स्वरूप बदलले नाही, हा सर्वांचा प्रत्यक्ष अनुभव आहे आणि आस्तिक तसेच भगवंताविषयी श्रद्धा ठेवणारे यांचे भगवान्ही कधी बदलले नाहीत, दुसरीकडे शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी सर्वचे सर्व बदलून गेले आणि संसारही बदलत असलेला प्रत्यक्ष दिसत असतो. यावरुन सिद्ध झाले की, कधी न बदलणारे ''भगवान्'' आणि ''स्व'' दोन्ही एका जातीचे आहेत आणि त्याचप्रमाणे निरंतर बदलणारे ''शरीर'' आणि ''संसार'' दोन्ही एका जातीचे आहेत. न बदलणारे ''भगवान्'' आणि ''स्व'' दोन्हीही व्यक्तरूपाने दिसत नाहीत; परंतु बदलणारे शरीर आणि संसार दोन्हीही व्यक्तरूपाने प्रत्यक्ष दिसत असतात. बदलणारे मन, बुद्धी , इंद्रिये, शरीरादीना पकडू-नच ''स्व'' आपल्याला बदलणारा मानतो. वास्तविक ''अहं'' चा जो सत्तारूपाने आधार (स्व) असतो तो, कधी बदलत नाही कारण तो परमात्म्याचा अंशस्वरूप आहे.

वास्तविक ''मी काय आहे'' याचा तर पत्ता लागत नाही, परंतु ''मी आहे'' या असण्यात थोडा देखील संशय नसतो. जसे संसार प्रत्यक्ष दिसत असतो, तसे ''मी'' पणाचे-ही भान होत असते. म्हणून तत्त्वत: ''मी'' काय आहे याचा शोध घेणे साधकासाठी फार उपयोगी आहे.

''मी'' काय आहे याचा तर पत्ता लागत नाही, परंतु संसार (शरीर) काय आहे याचा तर पत्ता आहेच. संसार (शरीर) उत्पत्ति-विनाश असणारा आहे, सदा एकरस राहणारा नाही—हा सर्वांचा अनुभव आहे. या अनुभवाला निरंतर जागृत ठेवले पाहिजे. ''संसार'' आणि ''मी'' या दोन्हीपैकी कोण्या एकाचेही योग्य ज्ञान झाल्यास दुसऱ्याच्या स्वरूपाचे ज्ञान आपोआप होते, हा नियम आहे.

''मी'' चा प्रकाशक आणि आधार (आपले स्वरूप) चेतन आणि नित्य आहे. म्हणून उत्पत्ति-विनाश असणाऱ्या जड संसाराशी, स्वरूपाचा कोणताच संबंध नाही. स्वरूपाचा तर भगवंताशी स्वत: सिद्ध संबंध आहे. या संबंधाला ओळ-खणे हेच ''मी'' च्या वास्तविकतेचा अनुभव करणे आहे. या संबंधाची ओळख झाल्यावर मन, बुद्धी आपोआप

भगवंतात लागून जातील.*

**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः**—येथे "**अथ उर्ध्वम्**" पदाचा भाव असा आहे की, ज्या क्षणी मन, बुद्धी भगवंतात पूर्णपणे लागून जातील, अर्थात् मन-बुद्धी-मध्ये किंचित्मात्रही आपलेपणा राहणार नाही, त्या क्षणी भगवत्प्राप्ती होऊन जाईल. मन-बुद्धी पूर्णपणे लागल्यावर भगवत्प्राप्तीत कालाचे काही अंतर राहील असे नाही.

भगवान् म्हणतात की, हे अर्जुन! माझ्यातच मन-बुद्धी लावल्यास तू माझ्यात निवास करशील यात संशय नाही. यावरुन असे दिसते की, अर्जुनाच्या अंत:करणात काही संशय आहे; तेव्हाच भगवान् "**न संशयः**" पद देत आहेत. जर संशयाची संभावना नसती, तर हे पद देण्याची आवश्यकताच नव्हती. तो संशय काय आहे ? मनुष्याच्या अंत: करणात ही गोष्ट पक्की बसलेली असते की, सत् कर्म करू, सदाचाराने आचरण करू, एकांतात जाऊन ध्यान लावू; तेव्हाच भगवत्प्राप्ती होईल आणि जर अशा प्रकारे साधन करू शकलो नाही तर परमात्मप्राप्ती असंभव आहे. हा भ्रम दूर करण्यासाठी भगवान् म्हणतात की, माझ्या प्राप्तीचा उद्देश ठेवून मन-बुद्धीला माझ्यात लावणे जितके मूल्यवान आहे, तितके ही सर्व साधने एकत्र मिळवूनही मूल्यवान ठरू शकत नाहीत. म्हणून मन-बुद्धीला माझ्यात लावल्याने निश्चितच माझी प्राप्ती होईल यात काही संशय नाही "**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम्**" (८।७)

जोपर्यंत बुद्धीत संसाराचे महत्त्व आहे आणि मनाने संसाराचे चिंतन होत राहते तोपर्यंत (परमात्म्यात स्वाभाविक स्थिती असूनही) आपली स्थिती संसारामध्येच आहे असे समजून घ्यावे. संसारात स्थिती अर्थात् संसाराचा संग राहण्यानेच संसार चक्रात घुमावे लागते.

उपर्युक्त पदाने, अर्जुनाचा संशय दूर करत भगवान् म्हणत आहेत की, तू ही चिंता करू नकोस की, माझ्या ठिकाणी मन-बुद्धी संपूर्णपणे लागल्यावर तुझी स्थिती काय होईल ? ज्या क्षणी तुझे मन-बुद्धी केवळ माझ्यात संपूर्ण-पणे लागले जातील, त्याच क्षणी तू माझ्यातच निवास करशील.

मन-बुद्धी भगवंताचे ठिकाणी लावण्याशिवाय साधकासाठी दुसरे कोणते कर्तव्य नसते. मन भगवंतात लावल्याने संसाराचे चिंतन होणार नाही आणि बुद्धी भगवंता-मध्ये लावल्याने साधक संसाराश्रयरहित होईल. संसाराचे कोणत्याही प्रकारे चिंतन आणि आश्रय न राहिल्याने भगवंताचेच चिंतन व भगवंताचाच आश्रय होईल, ज्यामुळे भगवंताचीच प्राप्ती होईल.

येथे मनाबरोबर "चित्त" ला तसेच बुद्धीबरोबर "अहम्" लाही घेतले पाहिजे. कारण भगवंतात चित्त आणि अहम् लागल्याविना "तू माझ्यातच निवास करशील" हे म्हणणे सार्थक होणार नाही.

संपूर्ण सृष्टीचे एकमात्र ईश्वर (परमात्मा), त्यांचाच साक्षात् अंश हा जीवात्मा आहे. परंतु हा या सृष्टीच्या क्षुद्र अंशाला (शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी) आपले मानून यांना आपल्याकडे खेचत असतो (१५।७) अर्थात् यांचा मालक होऊन बसतो. तो (जीवात्मा) या गोष्टीला सर्वथा विसरून जातो की, हे मन, बुद्धी इत्यादीही तर त्याच परमात्म्याच्या समष्टी सृष्टीचा एक अंश आहे. मी त्याच परमात्म्याचा अंश आहे आणि सर्वदा त्यातच स्थित आहे. याला विसरून तो आपली वेगळी सत्ता मानू लागतो. जसे एखाद्या करोडपतीचा मूर्ख मुलगा वडिलांपासून वेगळा होऊन आपल्या विशाल महालाच्या एक-दोन खोल्यावर आपला अधिकार करून आपल्याला धन्य समजतो, पण जेव्हा त्याला आपली चूक समजून येत असते तेव्हा त्याला कोट्याधिशाचा उत्तराधिकारी होण्यात काही अडचण येत नाही. याच उद्देशाने भगवान् म्हणतात. की, जर तू या व्यष्टी मन, बुद्धीला मला अर्पण करून टाकशील (जी वास्तविकच माझी आहेत आणि मीच समष्टी मन-बुद्धीचा स्वामी आहे.) तर स्वतः यांच्यापासून मुक्त होऊन (वास्तविक पूर्वीपासूनच माझा अंश आणि माझ्यातच स्थित असल्यामुळे) नि:संशय माझ्यातच निवास करशील.

भगवंतांनी सातव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकात पंच-महाभूत, मन, बुद्धी, अहंकार अशा प्रकारे आठ भागांत विभक्त असलेली आपली "अपरा (जड) प्रकृती" हिचे वर्णन केले आणि पाचव्या श्लोकात यापेक्षा वेगळी आपली जीवभूता "परा (चेतन) प्रकृती" हिचे वर्णन केले. या दोन्ही प्रकृतींना भगवंतांनी आपली म्हटले. म्हणून या दोन्हींचे स्वामी भगवान् आहेत. या दोन्हीपैकी जड प्रकृतीचे कार्य असल्यामुळे "अपरा-प्रकृती" तर निकृष्ट आहे आणि चेतन परमात्म्याचा अंश असल्यामुळे "परा-प्रकृती" श्रेष्ठ आहे १५।७. परंतु परा-प्रकृती (जीव) अज्ञानाने अपरा-प्रकृतीला

* चेतन आणि अविनाशी स्वरूपालाच (आत्मा) "स्व", "अहम्" चा आधार, वास्तविक "मी", "मी" चा प्रकाशक, आधार इत्यादी नावांनी संबोधले जाते.

आपली आणि आपल्यासाठी समजून तिच्याशी बांधली जाते आणि जन्म-मरणाच्या चक्रात सापडते (१३।२१). म्हणून भगवान् या श्लोकात हे म्हणत आहेत की, मन-बुद्धीरूपी अपरा-प्रकृतिशी आपलेपणा हटवून यांना माझीच समज, वास्तविक जी माझीच आहे. अशा प्रकारे मन-बुद्धी मला अर्पण केल्यास त्यांच्याशी अज्ञानाने मानलेला संबंध समाप्त होईल आणि तुला माझ्याशी असलेला आपल्या स्वत:सिद्ध नित्यसंबंधाचा अनुभव येईल.

## भगवत्प्राप्तीसंबंधी विशेष गोष्ट

भगवंताची प्राप्ती कोणत्या विशिष्ट साधनाने होत नाही, कारण ध्यानादी साधन शरीर, मन, बुद्धी इंद्रियांच्या आश्रयाने होत असतात. शरीर, मन, बुद्धी, इंद्रिये इत्यादी प्रकृतीचे कार्य असल्याने जड वस्तू आहेत. जड पदार्थाद्वारा चिन्मय भगवान् विकत घेतले जाऊ शकत नाहीत. कारण प्रकृतीचे संपूर्ण पदार्थ एकत्र मिळूनही चिन्मय परमात्म्याची बरोबरी करू शकत नाहीत.

सांसारिक पदार्थ कर्म (पुरुषार्थ) करण्यानेच प्राप्त होतात. म्हणून साधक भगवत्प्राप्तीही स्वाभाविकच कर्माने होणारी समजतो. म्हणून भगवत्प्राप्तीच्या संबंधातही, तो हाच विचार करतो की, माझ्याकडून केल्या जाणाऱ्या साधनेनेच भगवत्प्राप्ती होईल.

मनु-शतरूपा, पार्वती इत्यादींना तपश्चर्येनेच आपल्या इष्टाची प्राप्ती झाली. इतिहास पुराणादिकांत अशा प्रकारच्या कथा वाचण्या-ऐकण्याने साधकाच्या अंत:करणावर अशी छाप पडते की, साधनेद्वाराच भगवान् भेटतात आणि त्याची ही धारणा दृढ होत राहते. परंतु साधनेनेच भगवान् भेटतात अशी गोष्ट वास्तविक नाहीच. तपश्चर्येच्या साधनेने जेथे भगवंताची प्राप्ती झाल्याचे आढळून येते, तेथे देखील जडाशी मानलेल्या संबंधाचा संपूर्णपणे विच्छेद होण्यानेच झाली आहे, साधनांनी नव्हे. साधनेची सार्थकता असाधनाचा (जडाचा मानलेला संबंध) त्याग करण्यातच आहे. भगवान् सदा सर्वदा सर्वांना सहज प्राप्त आहेतच; परंतु जडाशी मानलेल्या संबंधाचा संपूर्णपणे त्याग झाल्यावरच त्यांचा प्रत्यक्ष अनुभव येतो. म्हणून भगवत्प्राप्ती जडाद्वारा होत नसून जडतेच्या त्यागाने (संबंध-विच्छेद) होत असते. म्हणून जे साधक आपल्या साधनेच्या बळावर भगवत्प्राप्ती मानतात, ते मोठी चूक करतात. साधनेची सार्थकता केवळ जडतेचा त्याग करण्यात आहे—या रहस्याला समजून न घेता साधनेत ममता केल्याने आणि त्याचा आश्रय घेतल्याने साधकाचा जडाशी संबंध कायम राहतो. जोपर्यंत अंत:-करणात जडतेचा किंचित्मात्र आदर आहे, तोपर्यंत भगवत्प्राप्ती होणे कठीण आहे. म्हणून साधकाने साधनेच्या साहाय्याने जडतेशी असलेला संबंध संपूर्णपणे विच्छेद करून घ्यावा.

केवळ भगवत्प्राप्तीच्या उद्देशाने केल्या जाणाऱ्या साधनेने जडतेच्या संबंधाचा सुगमतेने त्याग होतो.

**परिशिष्ट भाव**—मन-बुद्धी भगवंताची अपरा-प्रकृती आहे (गीता ७।४-५). भगवंताची प्रकृती अर्थात् स्वभाव असूनही अपरा-प्रकृती भगवंताहून भिन्न स्वभावाची (जड आणि परिवर्तनशील) आहे. परंतु परा-प्रकृती (जीवात्मा) भगवंताहून भिन्न स्वभावाची नाही. म्हणून भगवंताशी प्रकृतीचे साधर्म्य नाही, तर जीवाचे (स्वयंचे) साधर्म्य आहे—**'मम साधर्म्य मागता:'** (गीता १४।२). मन-बुद्धी प्रकृतीच्या जातीची आहे अर्थात् ते प्रकृतीचे अंश आहेत, परंतु आपण स्वत: भगवंताचे अंश आहोत. म्हणून स्वयं आणि मन-बुद्धीत जातीय भिन्नता आहे. आकर्षण आणि मिलन सजातीयतेतच होते, विजातीयतेत नव्हे—हा नियम आहे. म्हणून मन-बुद्धी भगवंतात लागू शकत नाहीत, तर स्वयं हाच भगवंतात लागू शकतो. मन-बुद्धीची स्वतंत्र सत्ता मानल्याने साधकाची ही भूल होते की, तो स्वयं वेगळा राहून मन-बुद्धीला भगवंतात लावण्याचा प्रयत्न करतो. परंतु वास्तविकता ही आहे की, भगवंतात स्वयं च लागतो, मन-बुद्धी लागत नाहीत. जेव्हा स्वयं भगवंतात लागतो. तेव्हा मन-बुद्धी आपोआप सुटतात अर्थात् त्यांची सत्ता राहत नाही, तर एक भगवान्च राहतात. कारण वास्तविक मन-बुद्धीची सत्ता नव्हतीच, जीवानेच त्यांना सत्ता दिली होती—**'ययेदं धार्यते जगत्'** (गीता ७।५), **'मन:षष्ठानीन्द्रियाणि प्रकृती स्थानि कर्षति'** (गीता १५।७). म्हणून गीतेत **'मय्यासक्तमना:'** (७।१), **'मन्मना भव'** (९।३४, १८।६५), **'मय्यावेश्य मनो ये माम्'** (१२।२), **'मय्येन मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय'** (१२।८), **'मच्चित्त: सततं भव'**. (१८।५७) इत्यादी पदांमध्ये जी मन लावण्याची गोष्ट आली आहे, ती वास्तविक स्वयंला भगवंतात लावण्याचाच उपाय आहे. भगवंतात मन-बुद्धी लावल्याने मन-बुद्धी तर लागत नाहीत, परंतु स्वयं लागतो—**'निवसिष्यसि मय्येव'**. कारण जीवाचा स्वभाव असा आहे की, तो तिथेच लागतो जिथे मन-बुद्धी लागतात. जसे सुई जिकडे जाते, धागा तिकडेच जातो, तसेच मन-बुद्धी जिकडे जातात तिकडेच स्वयं जातो. संसाराला सत्ता आणि महत्ता देऊन त्याच्याशी संबंध जोडल्याने मन-बुद्धी

संसारात लागते आणि संसारात मन-बुद्धी लागल्याने जीव स्वयं संसारात लागला. म्हणून जीवाला संसारातून हटविण्यासाठी भगवान् मन-बुद्धी आपल्यात लावण्याची आज्ञा देतात. जसे सोनार सोन्याला शुद्ध करण्यासाठी त्याला अग्नीत तापवितो, त्यावेळी सोन्यात मिसळलेला विजातीय पदार्थ (खोट) वेगळा होतो आणि शुद्ध सोने शिल्लक राहते. तसेच भगवंतात लावल्याने मन-बुद्धी वेगळे होतात आणि स्वयं भगवंतात मिसळून जातो अर्थात् केवळ भगवान्च राहतात. श्रीमद्भागवतात भगवान् म्हणतात—

**विषयान् ध्यायतश्चित्तं विषयेषु विषज्जते।**
**मामनुस्मरतश्चित्तं मय्येव प्रविलीयते॥** (११।१४।२७)

'विषयांचे चिंतन करण्याने मन विषयात फसून जाते आणि माझे स्मरण करण्याने मन माझ्यात विलीन होते अर्थात् मनाची सत्ता राहत नाही.'

तात्पर्य हे आहे की, भगवंतात लावल्याने मन-बुद्धी भगवंतात लागत नाहीत, तर लीन होतात. कारण मुळात अपरा-प्रकृती भगवंताचा स्वभाव आहे. भगवंतात लीन झाल्यावर मन-बुद्धीची स्वतंत्र सत्ताच राहत नाही, तर केवळ भगवान्च राहतात—'**वासुदेवः सर्वम्**' दुसऱ्या शब्दात, मन-बुद्धी संसारातून तर हटले परंतु भगवंताला पकडू शकले नाहीत, म्हणून त्यांची स्वतंत्र सत्ता राहतच नाही, केवळ भगवान् राहतात.

ज्ञानात स्वरूप मुख्य आहे आणि भक्तीत भगवान् मुख्य आहेत. म्हणून ज्ञानी स्वरूपात स्थित होतो—'**समदुःखसुखः स्वस्थः**' (गीता १४।२४) आणि भक्त भगवंतात स्थित होतो—'**निवसिष्यसि मय्येव**'. स्वरूपात स्थित झाल्यावर अखंडरसाचा अनुभव होतो. भगवंतात स्थित झाल्यावर मग भक्त सर्व ठिकाणी भगवंतालाच पाहतो.(गीता ६-३०) कारण त्याचा पूर्वीपासूनच हा भाव असतो की, भगवान् सर्वव्यापी आहेत.

या श्लोकात हा क्रम सांगितला आहे की, भगवंतात प्रथम साधकाचे मन लागते, मग बुद्धी लागते, मग स्वयं लागतो. स्वयं लागल्याने अहम् समाप्त होतो.

प्रेमात मन लागते आणि श्रद्धेमध्ये बुद्धी लागते. भगवंतात मन-बुद्धी लावण्याचे तात्पर्य भगवंतात प्रेम आणि श्रद्धा होणे अर्थात् संसाराची प्रियता आणि महत्ता न राहता केवळ भगवंतातच प्रियता आणि महत्ता होणे, हे आहे.

## अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम्।
## अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनञ्जय॥ ९॥

**अथ** = जर (तू)
**चित्तम्** = मनाला
**मयि** = माझ्यात
**स्थिरम्** = अचलभावाने
**समाधातुम्** = स्थिर (अर्पण) करण्यात
**न, शक्नोषि** = स्वतःला समर्थ मानत नसशील
**ततः** = तर
**धनञ्जय** = हे धनञ्जय!
**अभ्यास-योगेन** = अभ्यासयोग-द्वारा (तू)
**माम्** = माझ्या
**आप्तुम्** = प्राप्तीची
**इच्छ** = इच्छा कर.

***व्याख्या*— अथ चित्तं समाधातुं..........मामिच्छाप्तुं धनञ्जय—** येथे "**चित्तम्**" पदाचा अर्थ "मन" आहे. परंतु या श्लोकाचा मागील श्लोकात वर्णन केलेल्या साधनेशी संबंध आहे, म्हणून "**चित्तम्**" पदाने, येथे मन आणि बुद्धी दोन्हीही घेणे युक्तिसंगत आहे.

भगवान् अर्जुनाला म्हणतात की, जर तू मन-बुद्धीला माझ्या ठिकाणी अचलभावाने स्थापित करण्यास अर्थात् मला अर्पण करण्यास स्वतःला असमर्थ समजतोस, तर अभ्यासयोगाद्वारा मला प्राप्त करून घेण्याची इच्छा कर.

"अभ्यास" आणि "अभ्यासयोग" वेगवेगळे आहेत. एखाद्या लक्ष्यावर वारंवार चित्ताला लावण्याचे नाव "अभ्यास" आहे आणि समतेचे नाव "योग" आहे. समता ठेवूनच अभ्यास करणे "अभ्यासयोग" म्हटला जातो. केवळ भगवत्प्राप्तीच्या उद्देशाने केले गेलेले भजन, नामजप इत्यादी "अभ्यासयोग" आहे.

अभ्यासाबरोबर योगाचा संयोग न झाल्यास साधकाचा उद्देश संसारच राहील. संसाराचा उद्देश राहिल्याने स्त्री-पुत्र, धन-संपत्ती, मान-सम्मान, निरोगता-अनुकूलता इत्यादीच्या अनेक कामना उत्पन्न होतील. कामना ठेवणाऱ्या पुरुषांच्या क्रियांचे उद्देशही (कधी पुत्र, कधी धन, कधी

मान-सन्मान इत्यादी) वेगवेगळे राहतील. (२। ४१) म्हणून अशा पुरुषांच्या क्रियेत योग होणार नाही. जेव्हा संपूर्ण क्रियांचा उद्देश (ध्येय) केवळ परमात्माच असेल, तेव्हाच योग होईल.

साधक जेव्हा भगवत्प्राप्तीचा उद्देश ठेवून वारंवार नाम-जप इत्यादी करण्याचा प्रयत्न करत असतो तेव्हा त्याच्या मनात दुसरे अनेक संकल्पसुद्धा उत्पन्न होत राहतात. म्हणून साधकाने "माझे ध्येय भगवत्प्राप्तीच आहे" अशा प्रकारची दृढ धारणा करून इतर सर्व संकल्पापासून उपरत झाले पाहिजे.

**मामिच्छाप्तुम्—**या पदाने भगवान् "अभ्यासयोग" याला आपल्या प्राप्तीचे स्वतंत्र साधन सांगत आहेत.

मागील श्लोकात भगवंतांनी आपल्यात मन-बुद्धी अर्पण करण्यास सांगितले, आता या श्लोकात अभ्यासयोग करण्यास सांगतात. यावरुन अशी धारणा होते की, अभ्यासयोग भगवंतात मन-बुद्धी अर्पण करण्याचे साधन आहे. म्हणून अगोदर अभ्यासाद्वारा मन-बुद्धी भगवंताला अर्पण होतील, मग भगवत्प्राप्ती होईल. परंतु मन, बुद्धी अर्पण केल्यानेच भगवत्प्राप्ती होते असा काही नियम नाही. भगवंताच्या कथनाचे तात्पर्य हे आहे की, जर उद्देश भगवत्प्राप्तीचाच असेल अर्थात् उद्देशाबरोबर साधकाची पूर्ण एकता असेल तर केवळ "अभ्यासा" नेच त्याला भगवत्प्राप्ती होऊन जाईल.

जेव्हा साधक भगवत्प्राप्तीच्या उद्देशाने वारंवार नाम-जप, भजन-कीर्तन, श्रवण इत्यादीचा अभ्यास करतो, तेव्हा त्याचे अंत:करण शुद्ध होऊ लागते आणि भगवत्प्राप्तीची इच्छा जागृत होते. सांसारिक सिद्धी-असिद्धीत सम झाल्यास भगवत्प्राप्तीची इच्छा तीव्र होते. भगवत्प्राप्तीची इच्छा तीव्र झाल्यास भगवंताच्या दर्शनाविषयी व्याकूळता निर्माण होते. ही व्याकूळता त्याच्या शिल्लक असलेल्या सांसारिक आसक्तीला तसेच अनंत जन्मातील पापांना जाळून टाकते. सांसारिक आसक्ती तसेच पापांचा नाश झाल्यावर त्याचे केवळ भगवंता- वरच अनन्यप्रेम होते आणि तो भगवंताच्या वियोगाला सहन करू शकत नाही. जेव्हा भक्त भगवंताशिवाय राहू शकत नाही तेव्हा भगवंतही त्या भक्ताशिवाय राहू शकत नाहीत अर्थात् भगवान्ही त्याचा वियोग सहन करू शकत नाहीत आणि त्या भक्ताला भेटतात. (मिळतात)

साधकाला भगवत्प्राप्ती होण्यात उशीर होण्याचे कारण हे आहे की, तो भगवंताच्या वियोगाला सहन करत असतो. जर त्याला भगवंताचा वियोग असह्य होईल तर भगवत्प्राप्तीत उशीर लागणार नाही. भगवंत देश, काळ, वस्तू, व्यक्ती इत्यादीनी दूर नाहीतच. जेथे साधक आहे तेथे भगवान् आहेतच. भक्तातील उत्कंठेच्या उणीवेमुळेच भगवत्प्राप्तीत विलंब लागतो. सांसारिक सुख-भोगाच्या इच्छेमुळेच अशी आशा केली जात असते की, भगवत्प्राप्ती भविष्यात होईल. जर भगवत्प्राप्तीसाठी व्याकूळता आणि तीव्र उत्कंठा उत्पन्न झाली तर सुखभोगाच्या इच्छेचा आपोआप नाश होईल आणि वर्तमानकाळातच भगवत्प्राप्ती होऊन जाईल.

साधकाचा आरंभापासूनच जर असा दृढ निश्चय असेल की, मला तर केवळ भगवत्प्राप्तीच करून घ्यावयाची आहे (मग लौकिक दृष्टीने काही सुधरो की बिघडो) तर कर्मयोग, ज्ञानयोग अथवा भक्तियोग—कोणत्याही मार्गाने त्याला फारच लवकर भगवत्प्राप्ती होऊ शकते.

**परिशिष्ट भाव—**सहाव्या अध्यायात तर केवळ '**अभ्यासा**' ची गोष्ट आली होती (६। २६), परंतु येथे '**अभ्यासयोग**' याची गोष्ट आली आहे, त्यामुळे कल्याण होते. केवळ अभ्यास असेल आणि योग नसेल तर एक स्थिती (अवस्था) बनेल, परंतु कल्याण होणार नाही.

मनाचा निरोध करणे अथवा मनाला वारंवार भगवंतात लावणे हा अभ्यास आहे. अभ्यासयोगात मनाचा निरोध नाही, तर मनाशी संबंध-विच्छेद आहे—'**समत्वं योग उच्यते**' (गीता २। ४८)

## अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव।
## मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि॥ १०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अभ्यासे,** | = (जर तू) | **असि** | = असशील (तर) | **कर्माणि** | = कर्मांना |
| **अपि** | अभ्यासातही (योगातही) (स्वत:ला) | **मत्कर्म परम:** | = माझ्यासाठी-कर्म करण्याच्या परायण | **कुर्वन्** | = करीत राहिलास |
| | | | | **अपि** | = तरीही (तू) |
| | | **भव** | = हो. | **सिद्धिम्** | = सिद्धीला |
| **असमर्थ:** | = असमर्थ (समजत) | **मदर्थम्** | = माझ्यासाठी | **अवाप्स्यसि** | = प्राप्त होशील. |

*व्याख्या*— **अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव**—या ठिकाणी "अभ्यासे" पदाचा अभिप्राय मागील श्लोकात (नवव्या) वर्णित "अभ्यासयोग" याशी आहे. गीतेची अशी शैली आहे की, अगोदर सांगितलेल्या विषयाला पुन: संक्षेपाने वर्णन केले जाते. आठव्या श्लोकात भगवंतांनी आपल्यात मन-बुद्धी लावण्याच्या साधनेला नवव्या श्लोकात पुन: "**चित्तं समाधातुम्**" पदाने म्हटले. अर्थात् "**चित्तम्**" पदाच्या अंतर्गत मन-बुद्धी दोन्हींचा समावेश केला. त्याच-प्रमाणे नवव्या श्लोकात आलेल्या अभ्यासयोगासाठी येथे (दहाव्या श्लोकात) '**अभ्यासे**' पद आले आहे.

भगवान् म्हणतात की, जर तू पूर्व श्लोकात वर्णित अभ्यासयोगालाही असमर्थ असशील तर केवळ माझ्या-साठीच संपूर्ण कर्म करण्यास परायण हो. तात्पर्य, संपूर्ण कर्म (वर्णाश्रम धर्मानुसार शरीरनिर्वाह आणि आजीविकासंबंधी लौकिक, तसेच भजन, ध्यान, नाम-जप इत्यादी पारमार्थिक कर्म) यांचा उद्देश सांसारिक भोग आणि संग्रह न ठेवता केवळ भगवत्प्राप्तीच असावा. जी कर्म भगवत्प्राप्तीसाठी भगवदाज्ञेनुसार केली जातात, त्यांना "मत्कर्म" म्हणतात. जे साधक अशा प्रकारे कर्मपरायण असतात ते "मत्कर्म परम" म्हटले जातात. साधकाचा स्वत:चा संबंधही भगवंताशी असावा आणि कर्माचा संबंधही भगवंताशी असावा, तेव्हाच मत्कर्मपरायणता सिद्ध होईल.

साधकाचे ध्येय जर संसार (भोग आणि संग्रह) राहिले नाही, तर निषिद्ध क्रियांचा पूर्णपणे त्याग होईल कारण निषिद्ध क्रिया होण्यात संसाराची "कामना" च हेतू असते (३।३७) म्हणून भगवत्प्राप्तीचाच उद्देश झाल्याने साधकाच्या संपूर्ण क्रिया शास्त्रविहित आणि भगवदर्थच होतील.

**मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि**— भगवंतांनी ज्या साधनेसंबंधीचा विषय या श्लोकाच्या पूर्वार्धात "**मत्कर्मपरमो भव**" पदांनी सांगितला आहे, तोच विषय या पदांत पुन्हा सांगितला गेला आहे. भाव हा आहे की, केवळ परमात्म्याचा उद्देश झाल्यास त्या साधकाची स्थिती इतर ठिकाणी कशी राहू शकेल?

भगवंतांनी आठव्या श्लोकात ज्या रीतीने मन-बुद्धी आपणास अर्पण करण्याचे साधन, तसेच नवव्या श्लोकात अभ्यासयोगाचे साधन आपल्या प्राप्तीचे स्वतंत्र साधन सांगितले, तसेच येथे भगवान् "**मत्कर्मपरमो भव**" (केवळ माझ्यासाठी कर्म करण्यास परायण हो) या साधनेलाही आपल्या प्राप्तीचे स्वतंत्र साधन सांगत आहेत.

ज्याप्रमाणे धनप्राप्तीसाठी व्यापार इत्यादी कर्म करणाऱ्या मनुष्यांना जस-जसे धन प्राप्त होते, तस-तसे त्यांच्या मनात धनाचा लोभ आणि कर्म करण्याचा उत्साह वाढत राहतो, त्याप्रमाणे साधक भगवंतासाठीच जेव्हा संपूर्ण कर्म करतो, तेव्हा त्याच्या मनातही भगवत्प्राप्तीची उत्कंठा आणि साधन करण्याचा उत्साह वाढत राहतो. उत्कंठा तीव्र झाल्यास जेव्हा त्याला भगवंताचा वियोग असह्य होतो, तेव्हा सर्वत्र परिपूर्ण असलेले भगवान् त्याच्याशी लपून राहत नाहीत. भगवान् आपल्या कृपेने त्याला आपली प्राप्ती करवूनच देतात. जर साधकाचा उद्देश भगवत्प्राप्तीच आहे आणि तो संपूर्ण क्रिया भगवंतासाठीच करत आहे, तर याचा अभिप्राय असा आहे की, त्याने आपली संपूर्ण समज, सामुग्री, सामर्थ्य आणि समय भगवत्प्राप्तीसाठीच उपयोगात आणली आहे. याशिवाय तो करू तरी काय शकतो ? भगवान् त्या साधकापासून यापेक्षा अधिक अपेक्षाही ठेवत नाहीत. म्हणून त्याला आपली प्राप्ती करवितात. याचे कारण असे आहे की, भगवान् एखाद्या विशिष्ट साधनेने खरेदी केले जाऊ शकत नाहीत. भगवंताच्या महत्तेपुढे संपूर्ण सृष्टीचे महत्त्वही तुच्छ आहे, मग एखाद्या व्यक्तीद्वारा अर्पित झालेल्या सीमित सामुग्री आणि साधनेने त्यांची किंमत कशी मोजली जाऊ शकेल? म्हणून आपल्या प्राप्तीसाठी भगवान् साधकाकडून एवढीच अपेक्षा ठेवतात की, त्याने आपली पूर्ण योग्यता, सामर्थ्य इत्यादीना माझ्या प्राप्तीत लावावे. अर्थात् आपल्याजवळ काहीही राखून ठेवू नये आणि ही योग्यता, सामर्थ्य इत्यादीना आपलेही समजू नये.

**परिशिष्ट भाव**—अभ्यासापेक्षा क्रियांना भगवंताला अर्पण करणे सोपे आहे. कारण अभ्यास तर नवीन काम आहे जे करावे लागते, परंतु कर्म आपोआप होतात. कारण कर्म करण्याचा स्वभाव बनलेलाच असतो. आपल्यासाठी कर्म करण्याने मनुष्य बांधला जातो— '**कर्मणा बध्यते जंतु:**' म्हणून कर्मांना भगवंताला अर्पण करण्याने मनुष्य सुगमतेने भगवंताला प्राप्त होतो (गीता ९। २७-२८).

'**मदर्थमपि**' पदाचे तात्पर्य हे आहे की, आरंभापासून भगवंतासाठीच कर्म केली जावी.

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रित:।**
**सर्वकर्मफलत्यागं तत: कुरु यतात्मवान्॥ ११॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **अथ** | = जर | | | सांगितलेले साधनही) | **यतात्मवान्** | = | मन-इंद्रियांना वश करून |
| **मद्योगम्** | = माझ्या योगाच्या (समतेच्या) | **कर्तुम्** | = | करण्यात (स्वतःला) | **सर्वकर्मफल-** | = | संपूर्ण कर्मांच्या |
| **आश्रितः** | = आश्रित झालेला (तू) | **अशक्तः** | = | असमर्थ (मानत) | **त्यागम्** | | फलाच्या इच्छेचा त्याग |
| **एतत्, अपि** | = हे (पूर्व श्लोकात | **असि** | = | असशील, | **कुरु** | = | कर. |
| | | **ततः** | = | तर | | | |

*व्याख्या*— **अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः** — पूर्व श्लोकात भगवंतांनी आपल्यासाठीच संपूर्ण कर्म करण्याने आपली प्राप्ती होते हे सांगितले आणि आता या श्लोकात ते संपूर्ण कर्मांच्या फलत्यागरूपी साधनेविषयी सांगत आहेत. तेथे भगवंतासाठी संपूर्ण कर्म करण्यात भक्ती-ची प्रधानता असल्यामुळे त्याला ''भक्तियोग'' म्हणू आणि येथे सर्वकर्मफलत्यागात केवळ फलत्यागाची मुख्यता असल्याने याला ''कर्मयोग'' म्हणू. अशा प्रकारे भगवत्प्राप्तीची ही दोन्हीही स्वतंत्र (वेगवेगळी) साधने आहेत.

या श्लोकात ''**मद्योगमाश्रितः**'' पदाचा संबंध ''**अथैतदप्यशक्तोऽसि**'' शी मानणेच योग्य वाटते. कारण जर याचा संबंध ''**सर्वकर्मफलत्यागम् कुरु**'' शी मानला, तर भगवंताच्या आश्रयाची मुख्यता असलेमुळे येथे भक्तियोगच होईल. अशा स्थितीत दहाव्या श्लोकात सांगितलेल्या भक्तियोगाच्या साधनेशी याची भिन्नता राहणार नाही, परंतु भगवान् दहाव्या आणि अकराव्या श्लोकात क्रमाने ''भक्तियोग'' आणि ''कर्मयोग'' दोन भिन्न भिन्न साधने दाखवू इच्छितात.

दुसरी गोष्ट भगवंतांनी या श्लोकात ''**यतात्मवान्**'' (मन, बुद्धी, इंद्रियासहित शरीरावर विजय मिळविणारा) पदही दिले आहे. आत्मसंयमाची विशेष आवश्यकता कर्मयोगातच आहे. कारण आत्मसंयमाशिवाय सर्वकर्मफल-त्याग होणे असंभव आहे. म्हणूनही ''**मद्योगमाश्रितः**'' पदाचा संबंध ''**अथैतदप्यशक्तोऽसि**'' शी मानला पाहिजे, सर्वकर्मफलत्याग करण्याच्या आज्ञेशी नव्हे.

ज्याचा भगवंतावर तर तितका विश्वास नाही, परंतु भगवंताच्या विधानात अर्थात् देश-समाजाची सेवा इत्यादी करण्यात अधिक विश्वास आहे, त्यासाठी भगवान् या श्लोकात सर्वकर्मफलत्यागरूपी साधन सांगतात. तात्पर्य, जर तो संपूर्ण कर्म मला अर्पण करू शकत नसेल, तर जे फल प्राप्त करणे त्याच्या हातातील गोष्ट नाही, त्या फलाच्या इच्छेचा त्याग त्याने करावा—''**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन**'' (२। ४७). फलाच्या इच्छेचा त्याग करून कर्तव्यकर्म केल्यास, त्याचा संसाराशी संबंध-विच्छेद होऊन जाईल.

''**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान्**''— कर्मयोगाच्या साधनेत स्वाभाविकच कर्माचा विस्तार होत असतो; कारण योगाच्या प्राप्तीत अनासक्त भावाने कर्म करणे हेच हेतू म्हटले गेले आहे (६। ३), यामुळे कर्मात फलासक्ती असल्याने बंधनाचे भय राहते. म्हणून ''**यतात्मवान्**'' पदाने भगवान् कर्मफलत्यागाच्या साधनेत मन-इंद्रिये इत्यादीच्या संयमाची आवश्यकता प्रतिपादन करतात. ही लक्षात ठेवण्याची गोष्ट आहे की, मन-इंद्रियांचा संयम झाल्यावर कर्मफल-त्यागातही सुगमता होते. जर साधकाने मन-बुद्धी इंद्रियादिकांचा संयम केला नाही, तर स्वाभाविकच त्याच्या मनाद्वारा विषयाचे चिंतन होत राहील आणि त्याची त्या विषयात आसक्ती उत्पन्न होईल. यामुळे त्याचे पतन होण्याची फार शक्यता राहील (२। ६२-६३) त्यागाचा उद्देश असल्याने साधक मन-इंद्रियांचा संयम सुगमतेने करू शकतो.

येथे ''**सर्वकर्म**'' पद यज्ञ, दान, तप सेवा आणि वर्णाश्रमानुसार जीविका, तसेच शरीरनिर्वाहासाठी केल्या जाणाऱ्या शास्त्रविहित संपूर्ण कर्मांचे वाचक आहे. सर्वकर्मफल-त्यागाचा अभिप्राय कर्मफलाचा स्वरूपाने त्याग नसून, कर्म फलात ममता, आसक्ती, कामना, वासना इत्यादीचा त्याग करणेच आहे.

कर्मफलत्यागाच्या साधनेत कर्माचा स्वरूपाने त्याग करण्याविषयी सांगितले गेले नाही; कारण कर्म करणे तर जरूरी आहे (६। ३) जसे पूर्वी सांगितल्याप्रमाणे आवश्यकता केवळ कर्म आणि त्याच्या फलाविषयीच्या ममता, आसक्ती, कामना इत्यादीच्या त्यागाचीच आहे.

कर्मयोगाच्या साधकाने अकर्मण्य व्हावयास नको; कारण कर्मफलत्यागासंबंधी वचन ऐकून, प्रायः साधक असा विचार करतो की, जर काही मिळवावयाचेच नाही, तर मग कर्म करण्याची काय आवश्यकता आहे ? म्हणून भगवंतांनी दुसऱ्या अध्यायाच्या सत्तेचाळीसाव्या श्लोकात कर्मयोगाचा विषय सांगत असताना ''**मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि**'' ''तुझी कर्म न करण्यात आसक्ती नसावी'' हे सांगून साधकांसाठी अकर्मण्यतेचा (कर्माचा त्याग) निषेध केला आहे.

अठराव्या अध्यायाच्या नवव्या श्लोकात भगवंतांनी सात्त्विक त्यागाचे लक्षण सांगताना कर्माच्या फलासक्तीच्या त्यागालाच ''सात्त्विक त्याग'' म्हटले आहे, कर्माच्या स्वरूपाने त्यागाला नव्हे.

फलासक्तीचा त्याग करून क्रिया करत राहिल्याने क्रियांच्या करण्याचा वेग शांत होतो आणि पूर्वीची आसक्ती समाप्त होते. फलाची इच्छा न राहिल्याने कर्माशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होतो आणि नवीन आसक्ती उत्पन्न होत नाही. मग साधक कृतकृत्य होतो. पदार्थाविषयी राग, आसक्ती, कामना, ममता, फलेच्छा इत्यादीच क्रियेत वेग निर्माण करणारे आहेत. यांचे अस्तित्व असताना, हट्टाने क्रियांचा त्याग केला तरी क्रियांचा वेग शांत होत नाही. राग-द्वेष राहिले असल्याने साधकाची प्रकृती पुन्हा त्याला कर्मात प्रवृत्त करत असते. म्हणून राग-द्वेषादीचा त्याग करून निष्कामभावनेने कर्तव्यकर्म केल्यानेच क्रियांचा वेग शांत होतो.

ज्या साधकांची सगुण-साकार भगवंतात स्वाभाविक श्रद्धा आणि भक्ती नसते तर व्यावहारिक आणि लोकहिताचे कार्य करण्यातच अधिक श्रद्धा आणि रुची राहते, अशा साधकांसाठी हे (सर्वकर्मफलत्यागरूपी) साधन फार उपयोगी आहे.

भगवंतांनी जेथे-जेथे कर्मफलत्यागाविषयी म्हटले आहे, तेथे-तेथे फलेच्छेच्या त्यागाचा अध्याहार करून घेतला पाहिजे; कारण भगवंताच्या मताने आसक्ती आणि फलेच्छेचा पूर्णपणे त्याग झाल्यासच कर्माशी सर्वथा संबंध-विच्छेद होतो (१८। ६).

संपूर्ण कर्मांच्या फलाचा (फलेच्छा) त्याग भगवत्प्राप्तीचे स्वतंत्र साधन आहे. कर्मफलत्यागाने विषयासक्तीचा नाश होऊन शांती (सात्त्विक सुख) प्राप्त होते. त्या शांतीचा उपभोग न करण्याने (त्यात सुखबुद्धी करून गुंतून न राहिल्यास) ती शांती परम तत्त्वाचा बोध करवून त्याच्याशी अभिन्न करविते.

अकराव्या अध्यायाच्या पंचावन्नाव्या श्लोकात भगवंतांनी साधक भक्ताच्या पाच लक्षणात एक लक्षण "**सङ्गवर्जितः**" (आसक्तिरहित) सांगितले होते. या श्लोकात भगवान् संपूर्ण कर्माच्या फलत्यागाविषयी सांगत आहेत, जे संसाराच्या आसक्तीचा संपूर्णपणे त्याग झाल्यानेच संभव आहे. या (सर्वकर्मफलत्यागाचे) फल भगवंतांनी याच अध्यायाच्या बाराव्या श्लोकात तात्काळ परम शांतीची प्राप्ती होणे सांगितले आहे. म्हणून हे समजून घ्यावे की, केवळ आसक्तीचा संपूर्णपणे त्याग झाल्यानेच परमशांती अथवा भगवंताची प्राप्ती होते.

**परिशिष्ट भाव—**जर साधक संपूर्ण कर्म भगवंतासाठी करू शकत नसेल तर त्याने फलेच्छेचा त्याग करून कर्म करावे. कारण फलेच्छा हीच बंधनकारक आहे—'**फले सक्तो निबध्यते**' (गीता ५। १२).

***संबंध—*** *भगवंतांनी आठव्या श्लोकापासून अकराव्या श्लोकापर्यंत एका साधनेत असमर्थता असल्यास दुसरे, दुसऱ्या साधनेत असमर्थता असल्यास तीसरे, तीसऱ्या साधनेत असमर्थता असल्यास चौथे साधन सांगितले. यावरुन अशी शंका होते की, शेवटी सांगितले गेलेले "सर्वकर्मफलत्याग" साधन सर्वात कनिष्ठ आहे की काय? कारण त्याला शेवटी सांगितले गेले आहे; तसेच भगवंतांनी त्याचे (कर्मफलत्याग) कोणते फलही दाखविले नाही. या शंकेचे निवारण करून भगवान् सर्वकर्मफलत्यागरूपी साधनेची श्रेष्ठता; तसेच त्याचे फळ सांगतात.*

# श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते।
# ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम्॥ १२॥

**अभ्यासात्** = अभ्यासापेक्षा
**ज्ञानम्** = शास्त्रज्ञान
**श्रेयः** = श्रेष्ठ आहे,
**ज्ञानात्** = शास्त्रज्ञानाहून
**ध्यानम्** = ध्यान
**विशिष्यते** = श्रेष्ठ आहे (आणि)
**ध्यानात्** = ध्यानापेक्षा (ही)
**कर्मफल-त्यागः** = सर्व कर्मांच्या फलाच्या इच्छेचा त्याग (श्रेष्ठ आहे),
**हि** = कारण
**त्यागात्** = त्यागाने
**अनन्तरम्** = तात्काळच
**शान्तिः** = परम शांती प्राप्त होते.

***व्याख्या—*** [भगवंतांनी आठव्या श्लोकापासून अकराव्या श्लोकापर्यंत एका-एका साधनेत असमर्थता झाल्यास क्रमाने समर्पणयोग, अभ्यासयोग, भगवदर्थ कर्म, आणि कर्मफलत्याग—ही चार साधने सांगितली. यावरुन असे प्रतीत होते की, क्रमाने पहिल्या साधनेपेक्षा पुढचे साधन कनिष्ठ दर्जाचे आहे आणि शेवटी सांगितले गेलेले कर्मफलत्यागाचे साधन सर्वात कनिष्ठ दर्जाचे आहे. या विषयाची पुष्टी यावरुन ही होते की, पहिल्या तीन साधनेमध्ये भगवत्प्राप्तीरूपी फलाचा विषय ("**निवसिष्यसि मय्येव**", "**मामिच्छाप्तुम्**", तसेच "**सिद्धिमवाप्स्यसि**" या पदांनी) क्रमाने सांगितला गेला. परंतु अकराव्या श्लोकात जेथे कर्मफलत्यागाची आज्ञा दिली गेली आहे, तेथे त्याचे फल

भगवत्प्राप्ती सांगितले गेले नाही.

उपर्युक्त धारणांना समाप्त करण्यासाठी हा बारावा श्लोक सांगितला गेला आहे. यामध्ये भगवंतांनी कर्मफल-त्यागाला श्रेष्ठ आणि तात्काळ परमशांती देणारा सांगितले आहे, ज्यामुळे या चौथ्या साधनेला कोणी कनिष्ठ दर्जाचे समजू नये. कारण या साधनेमध्ये आसक्ती, ममता आणि फलेच्छेच्या त्यागाचीच प्रधानता असल्याने; ज्या तत्त्वाची प्राप्ती समर्पणयोग, अभ्यासयोग तसेच भगवदर्थ कर्म करण्याने होते, अगदी त्याच तत्त्वाची प्राप्ती कर्मफलत्यागानेही होते.

वास्तविक उपर्युक्त चारही साधने स्वतंत्रतेने भगवत्प्राप्ती करविणारी आहेत. साधकांची आवड, विश्वास, आणि योग्यतेच्या भिन्नतेमुळेच भगवंतांनी आठव्यापासून अकराव्या श्लोकापर्यंत वेगवेगळी साधने सांगितली आहेत.

येथे कर्मफलत्यागाचे फल (भगवत्प्राप्ती) स्वतंत्रपणे या बाराव्या श्लोकात सांगण्याचा आशय असा आहे की, समर्पणयोग, अभ्यासयोग, तसेच भगवदर्थ कर्म केल्याने भगवत्प्राप्ती होते, ही तर गोष्ट सर्वसाधारण प्रचलितच आहे; परंतु कर्मफलत्यागानेही भगवत्प्राप्ती होते ही गोष्ट प्रचलित नाही. म्हणूनच प्रचलित साधनेपेक्षा याची श्रेष्ठता दाखविण्यासाठी हा बारावा श्लोक सांगितला गेला आहे आणि त्यातच कर्मफलत्यागाचे फल सांगणे उचितच वाटते.]

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्**—महर्षी पातञ्जलि म्हणतात ''**तत्र स्थितौ यत्नोऽभ्यासः**'' योगदर्शन (१।१३) अर्थात् कोणत्याही एका विषयात स्थिती (स्थिरता) प्राप्त करण्यासाठी वारंवार प्रयत्न करण्याचे नाव ''अभ्यास'' आहे.

येथे (या श्लोकात) ''अभ्यास'' शब्द केवळ अभ्यासरूपी क्रियेचा वाचक आहे, अभ्यासयोगाचा वाचक नव्हे, कारण या (प्राणायाम, मनोनिग्रह इत्यादी) अभ्यासा-मध्ये शास्त्रज्ञान आणि ध्यान नाही, तसेच कर्मफलाच्या इच्छेचा त्यागही नाही. जडतेशी संबंध-विच्छेद झाल्यावरच योग होतो; परंतु उपर्युक्त अभ्यासामध्ये जडते (शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी) चा आश्रय राहतो.

येथे ''ज्ञान'' शब्दाचा अर्थ शास्त्रज्ञान आहे, तत्त्वज्ञान नव्हे, कारण तत्त्वज्ञान तर सर्वच साधनांचे फल आहे. म्हणून येथे ज्या ज्ञानाची अभ्यासाशी तुलना केली जात आहे, त्या ज्ञानात अभ्यास नाही, ध्यान नाही आणि कर्मफलत्यागही नाही. ज्या अभ्यासामध्ये ज्ञान नाही, ध्यान नाही आणि कर्मफलत्यागही नाही—अशा अभ्यासापेक्षा उपर्युक्त ज्ञानच श्रेष्ठ आहे.

शास्त्रांच्या अध्ययनाने आणि सत्संगद्वारा अध्यात्मिक माहिती तर मिळवून घ्यावी, परंतु त्यानुसार जर वास्तविक तत्त्वाचा अनुभव घेणार नाही आणि ध्यान, अभ्यास तसेच कर्मफलत्यागरूपी कोणत्याही साधनेचे अनुष्ठान करणार नाही तर अशा (केवळ शास्त्रांच्या) माहितीला येथे ''**ज्ञानम्**'' पद आले आहे. या ज्ञानाला उपर्युक्त अभ्यासापेक्षा श्रेष्ठ म्हणण्याचे तात्पर्य, अध्यात्मिकज्ञानरहित अभ्यास भगवत्प्राप्तीत तेवढा सहायक होत नाही, जेवढे अभ्यासरहितज्ञान सहायक होते. कारण ज्ञानाने भगवत्प्राप्तीची अभिलाषा जागृत होऊ शकते, ज्यामुळे संसारापासून उत्थान करून घेणे जितके सुगम होऊ शकते, तितके केवळ अभ्यासाने होत नाही.

**ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते**—येथे ''ध्यान'' शब्द केवळ मनाच्या एकाग्रतारूपी क्रियेचे वाचक आहे, ध्यानयोगाचे वाचक नव्हे. या ध्यानात शास्त्रज्ञान आणि कर्मफलत्याग नाही. असे ध्यान त्या ज्ञानापेक्षा श्रेष्ठ आहे, ज्या ज्ञानामध्ये अभ्यास, ध्यान आणि कर्मफलत्याग नाही. कारण ध्यानाने मनाचे नियंत्रण होत असते परंतु केवळ शास्त्रज्ञानाने मनाचे नियंत्रण होत नाही. म्हणून मन-नियंत्रणामुळे ध्यानाने जी शक्ती संचित होते, ती शास्त्रज्ञानाने होत नाही. जर साधक त्या शक्तीचा सदुपयोग करून परमात्म्याकडे अग्रेसर होऊ इच्छिल तर जितकी सुगमता त्याला होईल, तितकी शास्त्रज्ञानाने होणार नाही. याबरोबर ध्यान करणाऱ्या साधकाला (जर त्याने शास्त्राचे अध्ययन केले तर) मनाच्या एकाग्रतेमुळे वास्तविक ज्ञानाची प्राप्ती फार सुगमतेने होऊ शकते. परंतु केवळ शास्त्राध्ययन करणाऱ्या साधकाला (इच्छा असूनही) मनाच्या चंचलतेमुळे ध्यान लावणे कठीण जाते. [आजकालही पाहिले तर शास्त्राध्ययन करणारे पुरुष जितके मिळतात, तितके मनाच्या एकाग्रतेसाठी प्रयत्न करणारे मिळत नाहीत.]

**ध्यानात्कर्मफलत्यागः**—ज्ञान आणि कर्मफलत्याग-रहित ''ध्याना'' पेक्षा, ज्ञान आणि ध्यानरहित ''कर्मफल-त्याग'' श्रेष्ठ आहे. येथे कर्मफलत्यागाचा अर्थ, कर्म तसेच कर्मफलाच्या स्वरूपाचा त्याग नाही तर, कर्म आणि त्यांच्या फलामध्ये ममता, आसक्ती आणि कामनेचा त्यागच आहे.

संपूर्ण उत्पत्ति—विनाशशील वस्तू कर्मफल आहेत. त्यांच्या आसक्तीचा त्याग करणेच संपूर्ण कर्मांच्या फलांचा त्याग करणे होय.

कर्मामध्ये आसक्ती आणि फलेच्छा हीच संसार-बंधनाला कारण आहे. आसक्ती आणि फलेच्छा न राहिल्यास कर्मफलत्यागी पुरुष सुगमतेने संसारबंधनातून मुक्त होतो.

शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, योग्यता, सामर्थ्य, पदार्थ इत्यादी जे काही मनुष्याजवळ आहे, ते सर्वचे सर्व संसारापासून मिळालेले आहे, त्याचे व्यक्तिगत नव्हे. म्हणून कर्मफलत्यागी अर्थात् कर्मयोगी मिळालेल्या (शरीरादी) सर्व सामुग्रीला आपली आणि आपल्यासाठी न समजता तिला निष्कामभावनेने संसाराच्या सेवेमध्ये उपयोगात आणतो. अशा प्रकारे मिळालेल्या सामुग्रीचा (जडता) प्रवाह संसारा (जडता) कडेच झाल्याने कर्मयोग्याचा जडतेशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होतो आणि त्याला परमात्म्याशी असलेल्या आपल्या स्वाभाविक नित्यसिद्ध संबंधाचा अनुभव येतो. म्हणून कर्मयोग्यासाठी स्वतंत्र ध्यान लावण्याची आवश्यकता नाही. जर तो ध्यान लावू इच्छिल, तर कोणतीही सांसारिक कामना नसल्याकारणाने तो सुगमतेने ध्यान लावू शकतो. परंतु सकामभावनेमुळे सामान्य साधकाला ध्यान लावणे कठीण जाते.

गीतेच्या सहाव्या अध्यायामध्ये (ध्यानयोगाच्या प्रकरणात) भगवंतांनी स्पष्ट केले आहे की, ध्यानाचा अभ्यास करत करत, शेवटी जेव्हा साधकाचे चित्त केवळ परमात्म्याचे ठिकाणी स्थिर होते, तेव्हा तो संपूर्ण कामनारहित होतो आणि चित्त उपरम झाल्याने तो आपण आपल्यासह परमात्म्यात स्थित होतो. (६।१८-२०). परंतु कर्मयोगी संपूर्ण कामनांचा त्याग करून तात्काळ आपण आपल्यासह परमातमतत्त्वात स्थित होतो (२।५५). कारण ध्यानामध्ये परमात्म्याकडे चित्त लावले जाते, म्हणून त्यामध्ये चित्ताचा (जडतेचा) आश्रय असल्यामुळे चित्ताबरोबर (जडते) दीर्घकाळपर्यंत संबंध कायम राहतो. परंतु कर्मयोगामध्ये ममता आणि कामनेचा त्याग केला जातो म्हणून त्यात ममता आणि कामना (जडता) यांच्या त्यागाबरोबरच चित्ताचाही (जडते) आपोआप त्याग होतो. म्हणून परिणामी समानरूपाने परमात्मतत्त्वाची प्राप्ती होत असूनही ध्यानाचा अभ्यास करणाऱ्या साधकाला ध्येयात चित्त लावणे कठीण जाते, तसेच त्याला परमात्मतत्त्वाचा अनुभवही विलंबाने होतो, परंतु कर्मयोग्याला परमात्मतत्त्वाचा अनुभव सुगमतेने आणि शीघ्रतेने होतो. यावरुन सिद्ध होते की, ध्यानापेक्षा कर्मयोगाचे साधन श्रेष्ठ आहे.

आपले काही नाही, आपल्यासाठी काहीही नको आणि आपल्यासाठी काहीही करावयाचे नाही—हाच कर्मयोगाचा मूळ महामंत्र आहे, ज्यामुळे हा सर्व साधनाहून विलक्षण होतो—''**कर्मयोगो विशिष्यते**'' (५।२)

**त्यागाच्छान्तिरनन्तरम्**—येथे ''**त्यागात्**'' पद ''कर्मफलत्यागा'' साठीच आले आहे. त्यागाच्या स्वरूपाला विशेषरूपाने समजून घेण्याची आवश्यकता आहे. आपल्या स्वरूपाचा त्याग होऊ शकत नाही आणि ज्याच्याशी आपला संबंध नसतो त्याचाही त्याग होऊ शकत नाही. जसे सूर्याचा प्रकाश आणि उष्णता ही सूर्याची स्वरूपे आहेत. म्हणून प्रकाश आणि उष्णता यांच्याशी सूर्याचा वियोग होऊ शकत नाही आणि ज्याच्याशी (प्रकाश आणि उष्णता) वियोग होऊ शकत नाही त्याचा त्याग करणे अशक्य आहे. या उलट अंध:कार आणि शीतलता हे सूर्याचे स्वरूप नसल्यामुळे यांच्याशी सूर्याचा वियोगही म्हणता येत नाही, कारण सूर्याचे आपले स्वरूप नसल्याकारणाने त्यांचा (अंध:कार आणि शीतलता) वियोग अथवा त्याग नित्य आणि स्वत:सिद्ध आहे. म्हणून वास्तविक त्याग त्याचाच होत असतो जे आपले (स्वरूप) नसते परंतु भ्रमाने आपण त्याला आपले मानून घेतलेले असते.

जीव स्वत: चेतन आणि अविनाशी आहे, तसेच संसार जड आणि विनाशी आहे. जीव भ्रमाने (आपल्या अंशी परमात्म्याला विसरून) विजातीय संसाराला आपले मानून घेतो. म्हणून संसाराशी मानलेल्या संबंधाचाच त्याग करण्याची आवश्यकता आहे.

त्याग असीम असतो. संसाराच्या संबंधामध्ये तर सीमा असते परंतु संसाराच्या त्यागामध्ये (संबंध-विच्छेद) सीमा नसते. तात्पर्य, ज्या वस्तूंशी आपण आपला संबंध जोडतो, त्या वस्तूंना तर सीमा असते परंतु त्या वस्तूंचा त्याग असीम असतो. त्याग करताच परमात्मतत्त्वाची प्राप्ती होते. परमात्मतत्त्वाची प्राप्तीही असीम होते कारण परमात्मतत्त्व, देश, काळ, वस्तू, व्यक्ती इत्यादीच्या सीमेपासून रहित (असीम) आहे. सीमित वस्तूंचा मोह असल्यामुळे, त्या असीम परमात्मतत्त्वाचा अनुभव येत नाही.

''कर्मफलत्यागा'' मध्ये संसाराशी मानलेल्या संबंधाचा त्याग होतो. म्हणून येथे ''**त्यागात्**'' पद कर्म आणि त्याच्या फलाशी (संसार) भ्रमाने मानलेल्या, संबंधाचा त्याग करण्याच्या अर्थातच आले आहे. हेच त्यागाचे वास्तविक स्वरूप आहे.

त्यागाच्या अंतर्गत जप, भजन, ध्यान, समाधी इत्यादीच्या फलांचा त्यागही गृहित धरला पाहिजे. कारण जोपर्यंत जप, भजन, ध्यान, समाधी आपल्यासाठी केली जाते, तोपर्यंत व्यक्तित्व कायम राहिल्यामुळे बंधनही कायम राहते. म्हणून आपल्यासाठी केलेले ध्यान, समाधी इत्यादीही बंधनच आहे. म्हणून कोणत्याही क्रियेमध्ये आपल्यासाठी कशाचीही इच्छा न ठेवणे हाच ''त्याग'' आहे. वास्तविक त्यागामध्ये त्याग-

वृत्तीशीही संबंध विच्छेद होतो.

येथे "**शान्तिः**" पदाचे तात्पर्य, परमशांतीची प्राप्ती आहे. यालाच भगवत्प्राप्ती म्हणतात.

अभ्यास, ज्ञान आणि ध्यान—तिन्ही साधनांपैकी वास्तविक कर्मफलत्यागरूपी साधन श्रेष्ठ आहे. जोपर्यंत साधकांमध्ये फलाची आसक्ती राहते, तोपर्यंत ते (जडाचा आश्रय असल्यामुळे) मुक्त होऊ शकत नाहीत. (५। १२) म्हणून फलासक्तीच्या त्यागाची आवश्यकता अभ्यास, ज्ञान आणि ध्यान तिन्हीही साधनेत असते. जडता अर्थात् उत्पत्ति-विनाशशील वस्तूंचा संबंधच अशांतीला मुख्य कारण आहे. कर्मफलत्याग अर्थात् कर्मयोगात आरंभापासूनच कर्म आणि त्याच्या फलाच्या आसक्तीचा त्याग केला जातो (५। ११) म्हणून जडतेचा संबंध न राहिल्याने कर्मयोग्याला परमशांतीची शीघ्र प्राप्ती होते. (५। १२)

## कर्मफलत्यागसंबंधी विशेष गोष्ट

"कर्मफलत्याग" कर्मयोगाचेच दुसरे नाव आहे. कारण कर्मयोगात "कर्मफलत्याग" हा मुख्य आहे. हा कर्मयोग भगवान् श्रीकृष्णाच्या फार पूर्वीपासून लुप्तप्राय झाला होता (४। २) भगवंतांनी अर्जुनाला निमित्त करून कृपा-पूर्वक ह्या कर्मयोगाला पुन्हा प्रगट केले (४। ३) भगवंतांनी याला प्रगट करून प्रत्येक परिस्थितीमध्ये, प्रत्येक मनुष्याला कल्याणाचा अधिकार प्रदान केला अन्यथा अध्यात्ममार्गा-विषयी असा विचारही केला जाऊ शकत नव्हता की, एकांताशिवाय, कर्माचा त्याग केल्याशिवाय, वस्तूंचा त्याग केल्याशिवाय, स्वजनांचा त्याग केल्याशिवाय—प्रत्येक परिस्थितीत मनुष्य आपले कल्याण करून घेऊ शकतो.

कर्मयोगामध्ये फलासक्तीचा त्यागच मुख्य आहे. स्वस्थता-अस्वस्थता, धनवत्ता-निर्धनता, मान-अपमान, स्तुति-निंदा इत्यादी सर्व अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती कर्माच्या फलरूपात येत असतात. यांच्याशी राग-द्वेष राहिले असता कधीही परमात्म्याची प्राप्ती होऊ शकत नाही. (२। ४२-४४)

संपूर्ण उत्पन्न होणाऱ्या वस्तू कर्मफल आहेत. जे फल-रूपात मिळालेले असते, ते सदा राहणारे नसते; कारण जर कर्म सदा राहत नाही तर त्याच्यापासून उत्पन्न होणारे फल सदा कसे राहील? म्हणून त्याचे ठिकाणी आसक्ती, ममता करणे चूकच आहे. जे फल आत्ता मिळालेले नाही, त्याची कामना करणेसुद्धा चूक आहे. म्हणून फलासक्तीचा त्याग कर्मयोगाचे बीज आहे.

कर्मयोगामध्ये क्रियेची प्रधानता प्रतीत होते आणि शरीरादी जड पदार्थाशिवाय क्रिया होणे शक्य नाही, म्हणून कर्म आणि फलापासून सुटकारा मिळणे कठीण वाटते. परंतु वास्तविक पाहता मिळालेली कर्म-सामुग्री (शरीरादी जड पदार्थ) यांना आपली व आपल्यासाठी मानल्यानेच फला-सक्तीचा त्याग कठीण वाटतो. शरीरादी प्राप्त सामुग्रीविषयी कोणत्याही प्रकारची आसक्ती न ठेवता, कर्तव्यकर्म करत राहिल्यास परमात्म्याची प्राप्ती होते (३। १९). वास्तविक क्रिया कधीही बंधनकारक होत नाहीत. बंधनाचा मूळ हेतू कामना आणि फलासक्ती आहे. कामना आणि फलासक्ती समाप्त झाल्यास सर्व कर्म अकर्म होतात (४। १९-२३)

भगवंतांनी कर्मयोगाला कर्मसंन्यासापेक्षाही श्रेष्ठ म्हटले आहे (५। २). भगवंताच्या मताने स्वरूपाने कर्माचा त्याग करणारी व्यक्ती, संन्यासी नाही तर, कर्मफलाचा आश्रय न घेता, कर्तव्यकर्म करणारा कर्मयोगीच संन्यासी आहे (६। १). आसक्तिरहित कर्मयोगी सर्व संकल्पापासून मुक्त होऊन सुगमतेने योगारूढ होतो (६। ४). या उलट जे कर्म तसेच त्यांच्या फलांना आपले आणि आपल्यासाठी मानून सुखभोग घेतात, ते वास्तविक पापाचाच भोग करतात (३। १३). म्हणून फलासक्तीच संसारात बंधनाचे मुख्य कारण आहे—**फले सक्तो निबध्यते** (५। १२). याचा त्यागच वास्तविक त्याग आहे. (१८। ११)

गीता फलासक्तीच्या त्यागावर जितका भर देते, तितका अन्य कोणत्याही साधनेवर देत नाही. दुसऱ्या साधनेचे वर्णन करते वेळीही, कर्मफलत्यागाला त्याबरोबर सांगण्यत आले आहे. भगवंताच्या मतानुसार त्याग तोच आहे, ज्यामध्ये निष्कामभावाने आपले कर्तव्याचे पालन केले जाते आणि फलाविषयी कोणत्याही प्रकारची आसक्ती नसते. (१८। ६) उत्तमाती उत्तम कर्माविषयीही आसक्ती नसावी आणि अत्यंत साधारण कर्मामध्येही द्वेष नसावा. कारण, कर्म तर उत्पन्न होऊन समाप्त होतील; पण त्यांच्यामध्ये असणारी आसक्ती (राग) आणि द्वेष कायम राहील, जी बंधनाला हेतू असते. या उलट अहंभाव आणि राग-द्वेषरहित मनुष्यासमोर संपूर्ण प्राण्यांचे संहाररूपी कर्तव्यकर्म जरी आले तरीही, तो बंधनात सापडू शकत नाही. (१८। १७) म्हणूनच भगवान् "कर्मफलत्यागा" ला तप, ज्ञान, कर्म, अभ्यास, ध्यान इत्यादी साधनेपेक्षा श्रेष्ठ दाखवितात. दुसऱ्या साधनेत क्रिया तर उत्तम प्रतीत होतात, परंतु त्यापासून विशेष लाभ दिसून येत नाही तसेच श्रमसुद्धा अधिक होतात. परंतु फलासक्तीचा त्याग केल्यावर कोणतेही नवीन कर्म करावे लागत नाहीत, आश्रम, देश इत्यादिकात बदल करावा लागत नाही तर साधक जेथे आहे, जे करत आहे, ज्या परिस्थितीत आहे

त्यातच (फलासक्तीच्या त्यागाने) फारच सुगमतेने आपले कल्याण करून घेऊ शकतो.

नित्यप्राप्त परमात्म्याची फक्त अनुभूती होत असते, प्राप्ती होत नाही. जेथे ''परमात्मप्राप्ती'' म्हटली जाते, तेथे त्याचा अर्थ नित्यप्राप्ताची प्राप्ती अथवा अनुभवच मानला पाहिजे. ती प्राप्ती साधनेने होत नाही, तर जडतेच्या त्यागानेच होते. ममता, कामना आणि आसक्तीच जडता आहे. शरीर, मन, इंद्रिये, पदार्थ इत्यादींना ''मी'' आणि ''माझे'' मानणेच जडता आहे. ज्ञान, अभ्यास, ध्यान, तप, इत्यादी साधने करत-करत जेव्हा जडतेशी संबंध-विच्छेद होतो, तेव्हाच नित्यप्राप्त परमात्म्याची अनुभूती होते. या जडतेचा त्याग जितका कर्मफलत्यागाने अर्थात् कर्मयोगाने सुगम होतो, तितका ज्ञान, अभ्यास, ध्यान, तप इत्यादींनी होत नाही. कारण ज्ञानादी साधनांमध्ये शरीरादीला आपले आणि साधनेला आपल्यासाठी मानत राहिल्याने जडतेशी (शरीर, मन, बुद्धी, इंद्रिये) विशेष संबंध कायम राहतो. या साधनांचे ध्येय परमात्मप्राप्ती असल्याने शेवटी सफलता तर मिळते परंतु त्या सफलतेत विलंब आणि कष्ट होतात. परंतु कर्मयोगात आरंभापासूनच जडतेच्या त्यागाचे ध्येय राहते. जडतेचा संबंधच नित्यप्राप्त परमात्म्याच्या अनुभूतीमध्ये प्रधान बाधा आहे—ही गोष्ट अन्य साधनेत स्पष्ट प्रतीत होत नाही.

जेव्हा साधक हा दृढ निश्चय करतो की, मला कधीही कोणत्याही परिस्थितीत मन, वाणी अथवा क्रियेने चोरी, असत्य, व्यभिचार, हिंसा, छल, कपट, अभक्ष्य भक्षण, इत्यादी कोणतेही शास्त्र-विरुद्ध कर्म करावयाचे नाही, तेव्हा त्याच्याकडून आपोआप विहित कर्म होऊ लागतात.

साधकाने निषिद्ध कर्मांच्या त्यागाचाच निश्चय केला पाहिजे, विहित कर्मांच्या करण्याचा नव्हे! कारण जर साधकाने विहित कर्म करण्याचा निश्चय केला तर त्याचे ठिकाणी विहित कर्म करण्याचा अभिमान उत्पन्न होईल, त्यामुळे त्याचा ''अहम्'' सुरक्षित राहील. विहित कर्म करण्याचा अभिमान राहिल्याने निषिद्ध कर्म होतात. परंतु ''मी निषिद्ध कर्म करणार नाही'' या निषेधात्मक निश्चयामध्ये कोणती योग्यता, सामर्थ्याची अपेक्षा नसल्याकारणाने, साधकात अभिमान उत्पन्न होत नाही. निषिद्ध कर्माच्या त्यागातही मूर्खपणाने अभिमान उत्पन्न होऊ शकतो. जर अभिमान आला तर, विचार करावा की, जे करावयास नको होते ते केले नाही, तर यात विशेषता ती कोणती ? जेव्हा काही केले जाते, तेव्हाच फलाचीही कामना होते. जर काही केलेच नाही, केवळ निषिद्ध कर्मांचा त्यागच केला आहे,* तर मग फलाची कामना कशी होईल ? म्हणून करण्याचा अभिमान न राहिल्यास फलासक्तीचा त्याग आपोआप होतो. फलासक्तीचा त्याग झाल्यास शांती स्वत:सिद्ध आहे.

## साधनेसंबंधी विशेष संकेत

भगवंतांनी नवव्या, दहाव्या आणि अकराव्या श्लोकांत क्रमाने जी तीन साधने (अभ्यासयोग, भगवदर्थ कर्म आणि कर्मफलत्याग) सांगितली आहेत. विचारपूर्वक पाहिल्यास त्यापैकी (कर्मफलत्यागाला वगळून) प्रत्येक साधनेमध्ये शेष दोन्हीही साधने येतात. जसे (१) अभ्यासयोगामध्ये भजन, नाम-जप इत्यादी क्रिया केल्याने त्या भगवदर्थ आहेतच आणि नाशवान् फलाची कामना नसल्याने त्यात कर्मफल त्यागही आहे. (२) भगवदर्थ कर्मामध्ये भगवंतासाठी कर्म झाल्याने, अभ्यासयोगही आहे आणि नाशवान् फलाची कामना नसल्याने कर्मफलत्यागही आहे.

वास्तविक साधकाने सर्वांत प्रथम आपला उद्देश, ध्येय दृढ केला पाहिजे. त्यानंतर त्याने आपला संबंध वास्तविक कोणाशी आहे, हे ओळखले पाहिजे. मग त्याने कोणतेही साधन केले—अभ्यास, भगवदर्थ कर्म, अथवा कर्मफलत्याग, तेच साधन त्याच्यासाठी श्रेष्ठ साधन होईल. जर साधकाचे हेच ध्येय होईल की, त्याला भगवत्प्राप्तीच करावयाची आहे आणि तो हेही ओळखेल की, अनादिकालापासून त्याचा भगवंताशी स्वत:सिद्ध संबंध आहे, तेव्हा त्याच्यासाठी कोणतेही साधन कनिष्ठ राहणार नाही. कोणत्याही साधनेचे श्रेष्ठत्व अथवा कनिष्ठत्व, लौकिक दृष्टीनेच आहे. वास्तविक मुख्यता उद्देशाचीच आहे. म्हणून साधकाने आपल्या उद्दिष्टात कधीही किंचित्‌देखील ढिलाई येऊ देऊ नये.

कोणत्याही साधनेची सुगमता अथवा कठीणता, साधकाची आवड आणि उद्देश यावर आवलंबून असते. आवड आणि उद्देश एका भगवंताचा असल्यास साधन सुगम होते. तसेच आवड संसाराची आणि उद्देश भगवंताचा असल्याने साधन कठीण जाते.

जसे सर्वांची भूक सारखीच असते आणि जेवण केल्यानंतर तृप्तीचा अनुभवसुद्धा सर्वांना सारखा येत असतो.

* निषिद्ध कर्म न करण्याचा निश्चय झाल्यावर दोन अवस्था होतात—एक तर विहित कर्मात प्रवृत्ती होईल अथवा सर्वथा निवृत्ती! विहित कर्मांच्या प्रवृत्तीने अंत:करण शुद्ध होत असते आणि सर्वथा निवृत्ती झाल्याने परमात्म्यात स्थिती होत असते. सर्वथा निवृत्तीचे तात्पर्य, वासनारहित अवस्थेशी आहे, अकर्मण्यता किंवा आळस नव्हे, कारण आळस देखील निषिद्ध कर्मच आहे.

परंतु भोजनाची आवड सर्वांची वेगवेगळी असल्यामुळे भोज्य पदार्थही भिन्न भिन्न असतात. तसे साधकांची आवड, विश्वास, आणि योग्यतेनुसार साधनेही वेगवेगळी असतात परंतु भगवंताच्या अप्राप्तीचे दुःख तसेच भगवत्प्राप्तीची अभिलाषा (भूक) सर्व साधकात समान असते. साधक मग तो कोणत्याही श्रेणीचा का असेना, साधनेच्या पूर्णतेनंतर भगवत्प्राप्तीरूपी आनंदाची अनुभूती (तृप्ती) ही सर्वांना सारखीच येते.

या प्रकरणात अर्जुनाला निमित्त करून भगवंतांनी संपूर्ण मानवाच्या कल्याणासाठी चार साधने सांगितली आहेत (१) समर्पणयोग, (२) अभ्यासयोग, (३) भगवदर्थ कर्माचे अनुष्ठान आणि (४) सर्वकर्मफलत्याग. जरी चारही साधनेचे फल भगवत्प्राप्तीच आहे, तरीपण साधकांची आवड, श्रद्धा-विश्वास आणि योग्यता वेगवेगळी असल्याकारणानेच, वेगवेगळ्या साधनेंचे वर्णन झाले आहे. वास्तविक चारही साधने समानरूपाने स्वतंत्र आणि श्रेष्ठ आहेत. म्हणून साधकाने ज्या साधनेचा स्विकार केला असेल, त्यालाच त्याने सर्वोपरी मानले पाहिजे.

आपले साधन कधीही निकृष्ट मानू नये आणि साधनेच्या सफलतेच्या (भगवत्प्राप्ती) विषयात कधीही निराश होऊ नये, कारण कोणतेही साधन निकृष्ट नसते. जर साधकाचा एकमात्र उद्देश भगवत्प्राप्ती असेल, साधन त्याच्या आवड, विश्वास तसेच योग्यतेनुसार असेल, साधन पूर्ण सामर्थ्याने आणि तत्परतेने केले जाईल आणि भगवत्प्राप्तीची उत्कंठाही तीव्र असेल तर सर्व साधने एकसाररखी आहेत. साधकाने उद्देश, सामर्थ्य आणि तत्परता याविषयी कधीही हतोत्साह होऊ नये. भगवान् साधकाकडून एवढीच अपेक्षा ठेवतात की, त्याने आपले पूर्ण सामर्थ्य आणि योग्यता यांना साधनेत उपयोगात आणावे. साधक जरी भगवंताला योग्य रीतीने जाणत नसला तरी, सर्वज्ञ असलेले भगवान् त्याचा उद्देश, भाव, सामर्थ्य, तत्परता इत्यादीना उत्तम प्रकारे जाणतातच. जर साधकाने आपला उद्देश, भाव, प्रयत्न, तत्परता, उत्कंठा इत्यादीमध्ये कोणतीही उणीव येऊ दिली नाही, तर भगवान् स्वतः त्याला आपली प्राप्ती करून देतात. वास्तविक आपला प्रयत्न, बळ, ज्ञान इत्यादीच्या किंमतीने भगवंताची प्राप्ती होऊच शकत नाही. जर भगवंतांनी दिलेले बळ, ज्ञान इत्यादीना भगवंताच्या प्राप्तीसाठीच उपयोगात आणले गेले तर, भगवान् कृपेला परवश होऊन साधकास आपली प्राप्ती करवितात.

संसारात भगवत्प्राप्तीच सर्वात सोपी आहे आणि याचे सर्व अधिकारी आहेत, कारण याचसाठी मनुष्य शरीर मिळालेले आहे. सर्व प्राण्यांची कर्म वेगवेगळी असल्या- कारणाने कोणत्याही दोन व्यक्तीनाही एकसारखे पदार्थ मिळू शकत नाहीत. परंतु (भगवान् एक असल्याने) भगवत्प्राप्ती सर्वांना एकसारखी होत असते, कारण भगवत्प्राप्ती कर्मजन्य नाही.

भगवंताच्या प्राप्तीत संसारापासून वैराग्य आणि भगवत्प्राप्तीची उत्कंठा ह्या दोन गोष्टीच मुख्य आहेत. या दोन्हीपैकी कोणतेही एक साधन तीव्र झाल्यास भगवत्प्राप्ती होते. असे असले तरीही भगवत्प्राप्तीच्या उत्कंठेत विशेष शक्ती असते.

वर जी चार साधने सांगितली गेली आहेत, त्यापैकी पहिली तीन साधने तर मुख्यत्वाने भगवत्प्राप्तीची उत्कंठा जागृत करणारी आहेत आणि चौथे साधन (कर्मफलत्याग) प्रामुख्याने संसारापासून संबंध-विच्छेद करणारे आहे.

साधन कोणतेही असो, जेव्हा सांसारिक भोग दुःखदायी वाटतील तसेच भोगांचा अंतःकरणापासून त्याग होईल, तेव्हा (ध्येय भगवान् असल्याने) भगवंताकडे साधक तीव्रतेने आकृष्ट होईल आणि भगवत्कृपेनेच त्यांची प्राप्ती होईल.

त्याचप्रमाणे जेव्हा भगवान् परमप्रिय वाटू लागतील, त्यांच्याशिवाय राहवले जाणार नाही, त्यांच्या वियोगात व्याकूळता होऊ लागेल, तेव्हा लवकरच भगवंताची प्राप्ती होईल.

**परिशिष्ट भाव**—अभ्यास, शास्त्रज्ञान आणि ध्यान—ही तिन्ही करणसापेक्ष आहेत, परंतु कर्मफलत्याग करणनिरपेक्ष आहे. कर्मफल त्यागाला श्रेष्ठ सांगण्याचे कारण हे आहे की, लोकांची या साधनेत निकृष्ट बुद्धी आहे. याचे तात्पर्य हे नाही की, कर्मफल-त्याग पूर्वीच्या तिन्ही साधनांपेक्षा श्रेष्ठ आहे. वास्तविक ही चारीही साधने श्रेष्ठ आहेत आणि त्या साधकांसाठी आहेत, ज्यांचा उद्देश त्यागाचा आहे.

या श्लोकात आलेल्या चार साधनांच्या अंतर्गत दहाव्या श्लोकात आलेल्या '**मदर्थमपि कर्माणि**' (भगवंतासाठी कर्म करणे) ह्याला घेतले गेले नाही. याचे कारण असे आहे की, '**मदर्थमपि कर्माणि**' अर्थात् भक्तीतच साधनेची पूर्णता होते. म्हणून भक्ती आणि त्याग—दोन्हीही साधना श्रेष्ठ आहेत.

कर्मफलत्याग म्हणजे कर्मफलाच्या इच्छेचा त्याग. इच्छा अंतःकरणात होते आणि फलत्याग बाहेर होतो. फलत्याग केला तरीही अंतःकरणात त्याची इच्छा राहू शकते. म्हणून साधकाचा उद्देश कर्मफलाच्या त्यागाच्या इच्छेचा असावा. इच्छेचा त्याग झाल्यास जन्म-मरणाचे कारणच राहत नाही. मुक्ती वस्तूच्या त्यागाने होत नाही, तर इच्छेच्या त्यागाने होते.

*संबंध—भगवंतांनी निर्गुण-निराकार ब्रह्म आणि सगुण-साकार भगवंताची उपासना करणाऱ्या उपासकांपैकी, सगुण उपासकांना श्रेष्ठ सांगून अर्जुनाला सगुण उपासनेची आज्ञा केली. सगुण उपासनेच्या अंतर्गत भगवंतांनी आठव्यापासून अकराव्या श्लोकापर्यंत आपल्या प्राप्तीची चार साधने सांगितली. आता तेराव्यापासून एकोणीसाव्या श्लोकापर्यंत भगवान् पाच प्रकरणांत चारी साधनांनी सिद्धावस्थेला प्राप्त झालेल्या आपल्या प्रिय भक्तांच्या लक्षणांचे वर्णन करत आहेत. पहिले प्रकरण तेराव्या आणि चौदाव्या दोन श्लोकांचे आहे ज्यामध्ये सिद्ध भक्तांची बारा लक्षणे सांगितली गेली आहेत.*

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च।**
**निर्ममो निरहङ्कारः समदुःखसुखः क्षमी॥ १३॥**
**सन्तुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः॥ १४॥**

**सर्वभूतानाम्** = सर्व प्राण्यांमध्ये
**अद्वेष्टा** = द्वेषभावरहित
**च** = आणि
**मैत्रः** = मित्रभाव ठेवणारा (तसेच)
**करुणः, एव** = दयाळूही (आणि)
**निर्ममः** = ममतारहित,
**निरहङ्कारः** = अहंकाररहित,
**समदुःखसुखः** = सुख-दुःखाच्या प्राप्तीत सम,
**क्षमी** = क्षमाशील,
**सततम्** = निरन्तर
**सन्तुष्टः** = संतुष्ट,
**योगी** = योगी
**यतात्मा** = शरीराला वश करून घेतलेला
**दृढनिश्चयः** = दृढनिश्चयी,
**मयि** = माझ्यात
**अर्पित-मनोबुद्धिः** = मन-बुद्धी अर्पित केलेला
**यः** = जो
**मद्भक्तः** = माझा भक्त आहे,
**सः** = तो
**मे** = मला
**प्रियः** = प्रिय आहे.

*व्याख्या*— **अद्वेष्टा सर्वभूतानाम्**—अनिष्ट करणाऱ्यांचे दोन प्रकार आहेत. (१) इष्टाच्या प्राप्तीत अर्थात् धन, मान-सन्मान, आदर-सत्कार, इत्यादीच्या प्राप्तीत बाधा निर्माण करणारे आणि (२) अनिष्ट पदार्थ, क्रिया, व्यक्ती, घटना इत्यादींशी संयोग करविणारे. भक्ताच्या शरीर, मन, बुद्धी, इंद्रिये आणि सिद्धांताच्या प्रतिकूल मग कोणी कितीही, कोणत्याही प्रकारचा व्यवहार करो, इष्टाच्या प्राप्तीत बाधा आणो, कोणत्याही प्रकारची आर्थिक आणि शारीरिक हानी करो परंतु भक्ताच्या अंतःकरणात त्याच्याविषयी, कधीही, किंचित्मात्रही द्वेष नसतो. कारण तो प्राणीमात्रात आपल्या प्रभूलाच व्याप्त पाहतो. अशा स्थितीत तो विरोध करील तर कोणाशी करील ? **निज प्रभुमय देखहिं जगत केहि सन करहिं बिरोध॥** (मानस ७। ११२ ख) एवढेच नव्हे, तो तर अनिष्ट करणाऱ्यांच्या सर्व क्रियांनाही भगवंताच्या कृपेने पूर्ण असलेले मंगलमय विधानच मानतो.

प्राणीमात्र स्वरूपाने भगवंताचेच अंश आहेत. म्हणून कोण्याही प्राण्याविषयी थोडाही द्वेषभाव असणे, भगवंताविषयीच द्वेष होतो. म्हणूनच कोण्याही प्राण्याविषयी द्वेष राहिल्यास, भगवंताशी अभिन्नता तसेच अनन्यप्रेम होऊ शकत नाही. प्राणीमात्राविषयी द्वेषभावरहित झाल्यावरच भगवंताचे ठिकाणी पूर्ण प्रेम होऊ शकते. म्हणून भक्ताचे ठिकाणी प्राणिमात्रांविषयी द्वेषाचा संपूर्णपणे अभाव असतो.

**मैत्रः करुण एव च***—भक्ताच्या अंतःकरणात प्राणीमात्राविषयी केवळ द्वेषाचा अत्यंत अभावच नसतो, तर संपूर्ण प्राण्यांविषयी भगवद्भाव झाल्याने त्याचा सर्वांशी मैत्री आणि दयेचा व्यवहारही होतो. भगवान् प्राणीमात्रांचे सुहृद आहेत—"**सुहृदं सर्वभूतानाम्**" (५। २९) भगवंताचा स्वभाव भक्तामध्ये प्रतिबिंबित झाल्याकारणाने भक्तही संपूर्ण प्राण्यांचा सुहृद होतो—"**सुहृदः सर्व देहिनाम्**" (श्रीमद्भागवत् ३। २५। २१). म्हणून भक्ताचाही सर्व प्राण्यांविषयी निःस्वार्थ व स्वाभाविकच मैत्री आणि दयेचा भाव राहतो—

**हेतु रहित जग जुग उपकारी। तुम्ह तुम्हार सेवक असुरारी॥**
(मानस ७। ४७। ३)

आपले अनिष्ट करणाऱ्याशीही भक्ताकडून मित्रतेचा व्यवहार होत असतो, कारण त्याचा भाव असा असतो की, अनिष्ट करणाऱ्याने अनिष्टरूपात भगवंताचे विधानच प्रस्तुत

* येथे भक्ताची जी लक्षणे सांगितली आहेत, ती ज्ञानी (गुणातीत) पुरुषांच्या (१४। २२-२५ मध्ये वर्णित) लक्षणांपेक्षाही अधिक आणि विलक्षण आहेत. "मैत्रः" आणि "करुणः" ही पदे येथेच भक्त लक्षणातच आलेली आहेत.

केले आहे. म्हणून त्याने जे काही केले आहे, माझ्यासाठी योग्यच केले आहे. कारण भगवंताचे विधान सदैव मंगलमय असते. एवढेच नव्हे तर, भक्त असे समजतो की, माझे अनिष्ट करणारा (अनिष्टाविषयी निमित्त होऊन) माझ्या पूर्वकृत पापकर्मांचा नाश करत आहे, म्हणून तो विशेषरूपाने आदराचा पात्र आहे.

सर्व साधकांच्या मनात हा भाव राहतो आणि राहिलाही पाहिजे की, त्याचे अनिष्ट करणारा त्याच्या मागील पापांचे फळ भोगवून त्याला शुद्ध करत आहे. जर सामान्य साधकाचे ठिकाणी अनिष्ट करणाऱ्याविषयी मैत्री आणि करुणेचा भाव राहतो, तर मग सिद्ध भक्ताविषयी काय बोलावयाचे आहे? सिद्ध भक्ताचा त्याच्याविषयीच काय, सर्व प्राणीमात्राविषयी मैत्री आणि दयेचा विलक्षण भाव राहतो.

पातञ्जलयोगदर्शनामध्ये चित्तशुद्धीचे चार हेतू सांगितले गेले आहेत—"**मैत्रीकरुणामुदितोपेक्षाणां सुखदुखपुण्यापुण्यविषयाणां भावनातश्चित्तप्रसादनम्**" (१।३३) "सुखी असणाऱ्याविषयी मैत्री, दुःखी असणाऱ्याविषयी करुणा, पुण्यात्म्याविषयी प्रसन्नता आणि पापात्म्याविषयी उपेक्षा, असे भाव ठेवल्याने चित्तात शुद्धता येते"

परंतु भगवंतांनी या चार हेतूंना दोनमध्ये विभक्त केले आहे "**मैत्रः च करुणः**" तात्पर्य, सिद्ध भक्ताचा, सुखी आणि पुण्यात्म्याविषयी "मैत्री" चा भाव तसेच दुःखी आणि पापात्म्याविषयी "करुणेचा" भाव राहतो.

दुःखी व्यक्तीपेक्षा दुःख देणाऱ्यावर (उपेक्षेचा भाव न ठेवता) दया केली पाहिजे, कारण दुःखी व्यक्ती तर (मागील पापांचे फल भोगून) पापापासून मुक्त होत आहे परंतु दुःख देणारा नवीन पाप करत आहे. म्हणून दुःख देणारा दयेचा विशेष पात्र आहे.

**निर्ममः**—जरी भक्ताचा प्राणीमात्राविषयी स्वाभाविकच मैत्री आणि करुणेचा भाव राहतो, तरीपण त्याची कोणाविषयी किंचित्मात्रही ममता नसते. प्राणी आणि पदार्थाविषयी ममताच (माझेपणाचा भाव) मनुष्याच्या संसारबंधनाला कारण होते. भक्त ममतारहित असतो. त्याचे आपले म्हणविले जाणारे शरीर, इंद्रिये, मन आणि बुद्धी या विषयीही मुळीच ममता नसते. साधकाकडून ही चूक होत असते की, तो प्राणी आणि पदार्थावरील तर ममता हटविण्याचा प्रयत्न करतो परंतु आपल्या शरीर, मन, बुद्धी, आणि इंद्रिये यांच्यावरील ममता हटविण्याकडे तो विशेष लक्ष देत नाही. म्हणूनच तो सर्वथा निर्मम होऊ शकत नाही.

**निरहंकारः**—शरीर, इंद्रिये आणि जड पदार्थांना आपले स्वरूप मानल्याने अहंकार उत्पन्न होत असतो.

भक्ताची आपल्या शरीरादिकाविषयी किंचिन्मात्रही अहंबुद्धी नसल्याकारणाने, तसेच केवळ भगवंताशी असलेल्या आपल्या नित्य संबंधाचा अनुभव झाल्यामुळे त्याच्या अंतःकरणात आपोआप श्रेष्ठ, दिव्य, अलौकिक गुण प्रगट होऊ लागतात. या गुणांनाही तो आपले गुण मानत नाही तर (दैवी संपत्ती असल्याने) भगवंताचेच समजतो. "सत्" चे (परमात्मा) असल्याकारणानेच, हे गुण "सद्गुण" म्हटले जातात. अशा स्थितीत भक्त त्यांना आपले कसे काय मानू शकतो? म्हणून तो सर्वथा अहंकाररहित असतो.

**समदुःखसुखः**—भक्त सुख-दुःखाच्या प्राप्तीत सम राहतो अर्थात् अनुकूलता-प्रतिकूलता, त्याच्या अंतःकरणात राग-द्वेष, हर्ष-शोक इत्यादी विकार उत्पन्न करू शकत नाहीत.

गीतेमध्ये "सुख-दुःख" पद अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीसाठी (जी सुख-दुःख उत्पन्न करण्यात हेतू आहे) तसेच अंतःकरणात होणाऱ्या हर्ष-शोकादी विकारासाठीही आले आहे.

अनुकूल आणि प्रतिकूल परिस्थिती मनुष्याला सुखी-दुःखी करूनच त्याला बंधनात टाकते. म्हणून सुख-दुःखामध्ये सम होण्याचा अर्थ, अनुकूल अथवा प्रतिकूल परिस्थिती प्राप्त झाल्यास, आपल्यात हर्ष-शोकादी विकारांचे न होणे, असा आहे.

भक्ताचे शरीर, इंद्रिये, मन, सिद्धांत इत्यादींच्या अनुकूल अथवा प्रतिकूल प्राणी, पदार्थ, परिस्थिती, घटना, इत्यादीचा संयोग अथवा वियोग झाल्यास त्याला अनुकूल आणि प्रतिकूलतेचे "ज्ञान" तर होते; परंतु त्याच्या अंतःकरणात हर्ष-शोकादी कोणतेही विकार उत्पन्न होत नाहीत. या ठिकाणी ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे की, कोणत्याही परिस्थितीचे ज्ञान होणे हा काही स्वतःचा दोष नव्हे, तर त्यापासून अंतःकरणात विकार उत्पन्न होणेच दोष आहे. भक्त राग-द्वेष, हर्ष-शोक इत्यादी विकारापासून सर्वथारहित असतो. जसे, प्रारब्धानुसार भक्ताच्या शरीरात कोणता रोग झाल्यास त्याला शारीरिक दुःखाचे ज्ञान (अनुभव) तर होईल, परंतु त्याच्या अंतःकरणात कोणत्याही प्रकारचा विकार उत्पन्न होणार नाही.

**क्षमी**—आपला कोणताही अपराध करणाऱ्यास कोणत्या- ही प्रकारचा दंड देण्याची इच्छा न ठेवता त्याला क्षमा करणाऱ्यास "**क्षमी**" म्हणतात.

भक्ताच्या लक्षणात प्रथम "**अद्वेष्टा**" पद देऊन भगवंतांनी भक्ताच्या ठिकाणी आपला अपराध करणाऱ्या-

विषयी द्वेषाचा अभाव सांगितला. आता येथे "**क्षमी**" पदाने हे सांगत आहेत की, भक्ताच्या ठिकाणी आपला अपराध करणाऱ्याविषयी असा भाव राहत असतो की, त्याला भगवंताकडून अथवा अन्य कोणाकडूनही दंड मिळू नये. असा क्षमा भाव असणे ही भक्ताची एक विशेषता आहे.

**सन्तुष्टः सततम्***—जीवाला मनाच्या अनुकूल प्राणी, पदार्थ, घटना, परिस्थिती, इत्यादीच्या संयोगात आणि मनाच्या प्रतिकूल प्राणी, पदार्थ, घटना, परिस्थिती इत्यादीच्या वियोगात एक संतोष असतो. पदार्थ विजातीय आणि अनित्य असल्याकारणाने हा संतोष स्थायी राहू शकत नाही. जीव स्वतः नित्य असल्याकारणाने त्याला नित्य परमात्म्याच्या अनुभूतीनेच वास्तविक आणि स्थायी संतोष होत असतो.

भगवत्प्राप्ती झाल्यावर भक्त नित्य-निरंतर संतुष्ट असतो, कारण त्याचा भगवंताशी कधी वियोग होत नाही आणि त्याला नाशवान् संसाराची कोणती आवश्यकताही राहत नाही. म्हणून त्याच्या असंतोषाचे कोणतेही कारण राहत नसते. ह्या संतुष्टतेमुळे तो संसाराच्या कोणत्याही प्राणी पदार्थाविषयी किंचित्मात्रही महत्त्वबुद्धी ठेवत नाही.†

**सन्तुष्टः**—या पदाबरोबर "**सततम्**" पद देऊन भगवंतांनी भक्ताच्या त्या नित्य-निरंतर राहणाऱ्या संतोषाकडेच लक्ष वेधले आहे की, ज्या संतोषात कधी कोणता फरक पडत नाही आणि कधी फरक पडण्याची शक्यताही राहत नाही. कर्मयोग, ज्ञानयोग अथवा भक्तियोग—कोणत्याही योगमार्गाने सिद्धी प्राप्त करणाऱ्या महापुरुषाचे ठिकाणी अशी संतुष्टता (जी वास्तविक असते) निरंतर राहत असते.

**योगी**—भक्तियोगद्वारा परमात्म्याला प्राप्त झालेल्या (नित्य-निरंतर परमात्म्याशी संयुक्त) पुरुषाचे नाव येथे "योगी" आहे.

वास्तविक कोण्याही मनुष्याचा परमात्म्याशी कधी वियोग झाला नाही, होत नाही, होऊ शकत नाही आणि होणे शक्यही नाही. या वास्तविकतेचा ज्याने अनुभव घेतला आहे तोच "योगी" आहे.

**यतात्मा**—ज्याचा मन, बुद्धी इंद्रियासह शरीरावर पूर्ण अधिकार आहे, तो "यतात्मा" आहे. सिद्ध भक्ताला मन, बुद्धी इत्यादी वश करावे लागत नाहीत, तर ते स्वाभाविकच त्याच्या ताब्यात राहतात. म्हणून त्याच्यामध्ये कोणत्याही प्रकारचे इंद्रियजन्य दुर्गुण-दुराचार उत्पन्न होण्याची शक्यताच राहत नाही.

वास्तविक मन, बुद्धी इंद्रिये स्वाभाविक रीतीने सन्मार्गावर चालण्यासाठीच आहेत, परंतु संसाराशी आसक्तीयुक्त संबंध असल्याने हे मार्गच्युत होतात. भक्ताचा संसाराशी किंचिन्मात्रही आसक्तीयुक्त संबंध राहत नाही, म्हणून त्याची मन, बुद्धी इंद्रिये सर्वथा त्याच्या वशमध्ये असतात. म्हणून त्याची प्रत्येक क्रिया दुसऱ्यासाठी आदर्श असते.

असे पाहण्यात येते की, न्याय्य मार्गावर चालणाऱ्या सत्पुरुषांची इंद्रियेसुद्धा कधी कुमार्गगामी होत नाहीत. जसे राजा दुष्यन्ताची वृत्ती शकुंतलेकडे गेल्याने त्यांना असा दृढ विश्वास होतो की, ही क्षत्रिय-कन्याच असली पाहिजे, ब्राह्मण-कन्या नव्हे. कवी कालीदासांच्या कथनानुसार, जेथे संशय असेल तेथे सत्पुरुषाच्या अंतःकरणाची प्रवृत्तीच प्रमाण असते—

**सतां हि संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमन्तः करणप्रवृत्तयः॥**
(अभिज्ञान शाकुन्तलम् १। २१)

जर न्याय्यशील सत्पुरुषाच्या इंद्रियांची प्रवृत्तीही सहज कुमार्गाकडे वळत नाही,तर सिद्ध भक्ताची (जो न्याय्य धर्मापासून कधी कोणत्याही अवस्थेत च्युत होत नाही) मन, बुद्धी इंद्रिये कुमार्गाकडे कशी जाऊ शकतील ?

**दृढनिश्चयः**—सिद्ध महापुरुषाच्या दृष्टीत संसाराच्या स्वतंत्र सत्तेचा संपूर्णपणे अभाव राहतो. त्याच्या बुद्धीत एका परमात्म्याचीच अटळ सत्ता राहत असते. म्हणून त्याच्या बुद्धीत विपर्यय दोष (प्रतिक्षण बदलणाऱ्या संसाराचे स्थायी दिसणे) राहत नसतो. त्याला एका भगवंताशीच आपल्या नित्यसिद्ध संबंधाचा अनुभव होत राहतो. म्हणून त्याचा भगवंताच्या ठिकाणी दृढ निश्चय असतो. त्याचा हा निश्चय बुद्धीत राहत नसून "स्व" मध्ये असतो ज्याचा आभास बुद्धीत प्रतीत होतो.

संसाराची स्वतंत्र सत्ता मानल्याने अथवा संसाराशी

---

* अशा संतोषाविषयी भागवतकार म्हणतात—

सदा संतुष्टमनसः सर्वाः सुखमया दिशः। शर्कराकण्टकादिभ्यो यथोपानत्पदः शिवम्॥ (श्रीमद्भा०७। १५। १७)

पायात जोडे घालून चालणाऱ्यास जसे खडे, काटे यांचे भय नसते, तसेच संतोषी माणसाला सदा सर्वदा सर्वत्र सुखच सुख असते, दुःख नसतेच.

† संत कबीरदास जी म्हणतात—

गोधन, गजधन, बाजिधन, और रतन धन खान। जब आवै संतोष धन, सब धन धूरि समान॥

आपला संबंध मानल्यानेच बुद्धीत विपर्यय आणि संशयरूपी दोष उत्पन्न होत असतो. विपर्यय आणि संशययुक्त बुद्धी कधी स्थिर नसते. ज्ञानी आणि अज्ञानी पुरुषाच्या बुद्धीच्या निश्चयातही फरक असतो. स्वरूपात तर दोन्ही समानच असतात. अज्ञान्याच्या बुद्धीत संसाराची सत्ता आणि त्याचे महत्त्व राहते, परंतु सिद्ध भक्ताच्या बुद्धीत एका भगवंताशिवाय संसारातील कोणत्याही वस्तूची स्वतंत्र सत्ता राहत नाही आणि त्याचे कोणते महत्त्वही राहत नाही. म्हणून त्याची बुद्धी विपर्यय आणि संशय दोषापासून संपूर्णपणे रहित असते आणि त्याचा केवळ परमात्म्याविषयीच दृढ निश्चय असतो.

**मय्यर्पितमनोबुद्धिः**—जेव्हा साधक एकमात्र भगवत्प्राप्तीलाच आपला उद्देश ठरवितो आणि स्वतः भगवंताचाच होऊन जातो (वास्तविक तो तसाच आहे) तेव्हा त्याचे मन, बुद्धीही आपोआप भगवंतात लागतात. तर मग सिद्ध भक्ताचे मन-बुद्धी भगवंताला अर्पित राहतील, हे काय सांगावे लागेल ?

जेथे प्रीती असते, तेथे स्वाभाविकच मनुष्याचे मन आकृष्ट होत असते आणि मनुष्य ज्याला सिद्धांताने श्रेष्ठ समजतो, त्या ठिकाणी त्याची बुद्धी स्वाभाविकच समरस होते. भक्तासाठी भगवंतापेक्षा अधिक कोणी प्रिय आणि श्रेष्ठ नसतोच. भक्त तर मन-बुद्धीवर आपला अधिकारही मानत नाही. तो तर त्यांना सर्वथा भगवंताचेच मानतो. म्हणून त्याचे मन-बुद्धी स्वाभाविकच भगवंताचे ठिकाणी तल्लीन राहतात.

**यः मद्भक्तः स मे प्रियः** *—भगवंताला तर सर्व प्रिय आहेत, परंतु भक्ताचे प्रेम भगवंताशिवाय अन्यत्र कुठेही नसते. अशा स्थितीत **''ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्''** (४। ११) या प्रतिज्ञेनुसार भगवंतालाही भक्त प्रिय असतो.

**परिशिष्ट भाव**—गीतेत कर्मयोग्याची लक्षणेही आली आहेत (२। ५५-७२, ६। ७-९), ज्ञानयोग्याची लक्षणेही आली आहेत (१४। २२-२५) आणि भक्ताची लक्षणेही आली आहेत (१२। १३-१९). परंतु केवळ भक्ताच्या लक्षणातच भगवंताने म्हटले आहे—**'अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च'** हे लक्षण (मैत्री आणि करुणा) कर्मयोग्याच्या लक्षणामध्येही आले नाही आणि ज्ञानयोग्याच्या लक्षणामध्येही आले नाही, तर केवळ भक्ताच्या लक्षणातच आले आहे. कर्मयोगी आणि ज्ञानयोगी यांच्यात समता तर असते, परंतु मित्रता आणि करुणा नसते. परंतु भक्तात आरंभापासूनच मैत्री आणि करुणा असते.

भक्ताच्या दृष्टीत संपूर्ण प्राणी समग्र भगवंताचे अंग असल्याने आपले प्रभूच आहेत, मग कोण वैर करेल, कोणाशी करेल आणि का करेल?—***'निज प्रभुमय देखहिं जगत केहि सन करहिं बिरोध'*** (मानस, उत्तर० ११२ ख) उदाहरणार्थ, कोणाला राम प्रिय आहेत, कोणाला कृष्ण प्रिय आहेत, कोणाला शंकर प्रिय आहेत तर इष्ट वेग-वेगळे असले तरीही ते सर्व भक्त परस्पर एक होऊ शकतात. परंतु सर्व ज्ञानयोगी परस्पर एक होऊ शकत नाहीत. जर भक्त आणि ज्ञानयोगी एकमेकांना भेटले तर भक्त ज्ञानयोग्याच्या जितका आदर करेल, तितका आदर ज्ञानयोगी भक्ताचा करू शकणार नाही. म्हणून भक्तांचे लक्षण सांगितले आहे—***'सबहिं मानप्रद आपु अमानी'*** (मानस उत्तर० ३८। २)

श्रीरामचरितमानसच्या आरंभी गोस्वामी तुलसीदासजी महाराज सज्जनांबरोबर दुष्टांचीही वंदना करतात आणि सत्यभावाने करतात—***'बहुरि बंदि खल गन सतिभाएँ'*** (मानस बाल० ४। १). असे भक्तच करू शकतो, ज्ञानयोगी नव्हे! जरी ज्ञानयोग्याचे कोणाशी कधी किंचिन्मात्रही वैर नसते तरी त्याची स्वाभाविक उदासीनता, तटस्थता राहते. विवेकमार्गात (ज्ञानमार्गात) वैराग्याची मुख्यता राहते आणि वैराग्य रुक्ष असते. म्हणून ज्ञानयोगात अंतःकरणात कठोरता नसूनही वैराग्य, उदासीनतेमुळे बाहेरुन कठोरता प्रतीत होते.

सुख घेण्यात कठोरता राहते आणि सुख देण्यात कोमलता राहते. ज्ञानयोगी मोक्षाचेही सुख घेतो तर त्याच्यात कठोरता राहते. परंतु दुसऱ्याला सुख देण्याचा भाव असल्याने भक्तात आरंभापासूनच कोमलता असते. भक्ताच्या मनात वैऱ्याविषयीही द्वेष नसतो. ज्ञानयोगी पित्याप्रमाणे असतो आणि भक्त मातेप्रमाणे असतो. म्हणून भक्तात करुणा अधिक असते.

**'एव'** पद देण्याचे तात्पर्य हे आहे की, भक्त द्वेषभावरहित असतो—एवढेच नव्हे तर तो मैत्रीभाव ठेवणारा आणि दयाळूही असतो.

---

* भगवान श्रीराम म्हणतात—

अखिल बिस्व यह मोर उपाया। सब पर मोहि बराबरि दाया॥
तिन्ह महँ जो परिहरि मद माया। भजै मोहि मन बच अरु काया॥
पुरुष नपुंसक नारि वा जीव चराचर कोइ।
सर्ब भाव भज कपट तजि मोहि परम प्रिय सोइ॥ (मानस उत्तर ८७। ४। ८७ क)

**'निर्ममो निरहङ्कारः'**—प्रत्येक साधकासाठी निर्मम आणि निरहंकार होणे फार आवश्यक आहे. म्हणून गीतेत भगवंताने कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग— तिन्हीही योगमार्गात निर्मम आणि निरहंकार होण्याविषयी म्हटले आहे—कर्मयोगात **'निर्ममो निरहङ्कारः स शान्तिमधिगच्छति'** (२।७१), ज्ञानयोगात् **'अहङ्कारं.......विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूताय कल्पते'** (१८। ५३) आणि भक्तियोगात **'निर्ममो निरहङ्कारः समदुःखसुखः क्षमी'** (१२।१३) या विषयात विशेष लक्ष देण्याची एक गोष्ट आहे की, वास्तविक आपले स्वरूप अहंता-ममतेपासून रहित आहे. अहंता (मीपणा) आणि ममता (माझेपणा)—दोन्ही आपल्या स्वरूपात मानलेल्या आहेत, वास्तविक नाहीत. जर या वास्तविक असत्या तर आपण कधी निर्मम आणि निरहंकार होऊ शकलो नसतो आणि भगवंतानेही सर्वांसाठी निर्मम आणि निरहंकार होण्याविषयी म्हटले नसते. परंतु आपण निर्मम आणि निरहंकार होऊ शकतो, म्हणूनच भगवान् असे म्हणत आहेत.

कर्मयोगात प्रथम 'कामना' हिचा त्याग होतो, मग कर्मयोगी आपोआप निर्मम आणि निरहंकार होतो (गीता २।७१). ज्ञानयोगात प्रथम 'अहंकार' याचा त्याग होतो, मग ज्ञानयोगी आपोआप निर्मम होतो (गीता १८।५३). भक्तियोगात भक्त आपल्या स्वत:ला भगवंताला अर्पित करतो तेव्हा तो भगवत्कृपेने आपोआप निर्मम आणि निरहंकार होतो.

**'मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः'**—येथे **'मय्यर्पित मनोबुद्धि'** पद अशा मनुष्याचे वाचक आहे ज्याने स्वत:ला (आपण-आपल्याला) भगवंताला अर्पित केले आहे. स्वत: अर्पित झाल्याने मन-बुद्धीही आपोआप भगवंताला अर्पित होतात. स्वत: अर्पित झाल्याने मग काही शिल्लकच राहत नाही. कारण स्वयं आधी आहे आणि शरीर-मन-बुद्धी इत्यादी त्याच्या नंतर आहेत. जीवाचा भक्त आधी आहे, मनुष्यत्व नंतर आहे. भगवंतात अर्पित झाल्याने मन-बुद्धीची स्वतंत्र सत्ता राहत नाही, तर केवळ भगवान्च राहतात.

भगवंताचा परा आणि अपरा दोन्ही प्रकृतींशी सारखा संबंध आहे. परंतु जीवाचा (पराच) संबंध अपराशी नाही. कारण जीव अपरा-प्रकृतीहून उत्कृष्ट आहे आणि भगवंताचा अंश आहे. म्हणून जीवाचा संबंध भगवंताशी आहे. **'मय्यर्पित मनोबुद्धिः'** चे तात्पर्य, जीवाने अपरा-प्रकृतीला (मन-बुद्धीला) आपले मानू नये तर भगवंतालाच आपले मानावे.*

भगवान् ज्ञानस्वरूप आणि नित्य परिपूर्ण आहेत. म्हणून त्यांच्यात ज्ञानाची भूक (जिज्ञासा) तर नाही परंतु प्रेमाची भूक (प्रेम-पिपासा) अवश्य आहे. म्हणून भगवान् म्हणतात की, माझ्यात मन-बुद्धी अर्पित केलेला जो माझा भक्त आहे तो मला प्रिय आहे. अशा भक्ताशिवाय भगवंताला आवडता दुसरा कोणी होऊच शकत नाही.

राजाच्या मुलाने दुसऱ्याकडे भीक मागावी हे जसे राजाला आवडत नाही तसेच सत्-चित्-आनंदरूप भगवंताचा अंश असलेला जीव जेव्हा असत्-जड-दुखरूप संसारापासून काही आशा ठेवतो तेव्हा ते भगवंताला आवडत नाही, बरे वाटत नाही, कारण यात जीवाचे महान अहित आहे. भगवंताला तोच आवडतो जो दुसऱ्याकडून आशा ठेवत नाही आणि त्यातच जीवाचे परम हित होते—

**एक बानि करुनानिधान की। सो प्रिय जाकें गति न आन की॥**

(मानस, अरण्य० १०।४)

*संबंध—सिद्ध भक्ताच्या लक्षणांचे दुसरे प्रकरण, ज्यामध्ये सहा लक्षणांचे वर्णन आहे, पुढील श्लोकात आले आहे.*

## यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः।
## हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः॥१५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यस्मात्** | = ज्याच्या मुळे | **लोकात्** | = कोण्या प्राण्यामुळे | **भयोद्वेगैः** | भय आणि उद्वेगापासून (खळबळी पासून) |
| **लोकः** | = कोणीही प्राणी | **न, उद्विजते** | = उद्विग्न (क्षुब्ध) होत नाही | **मुक्तः** | = रहित आहे, |
| **न, उद्विजते** | = उद्विग्न (क्षुब्ध) होत नाही | **च** | = तसेच | **सः** | = तो |
| **च** | = आणि | **यः** | = जो | **मे** | = मला |
| **यः** | = जो स्वत:ही | **हर्षामर्ष** | = हर्ष, अमर्ष (ईर्ष्या) | **प्रियः** | = प्रिय आहे. |

* येथे 'मन' याच्या अंतर्गत चित्ताला आणि बुद्धीच्या अंतर्गत अहम्‌लाही गृहित धरावे.

*व्याख्या*— **यस्मान्नोद्विजते लोकः**—भक्त सर्वत्र आणि सर्वांमध्ये आपल्या परमप्रिय प्रभूलाच पाहत असतो. म्हणून त्याच्या दृष्टीत मन, वाणी आणि शरीराकडून होणाऱ्या संपूर्ण क्रिया एकमात्र भगवंताच्या प्रसन्नतेसाठीच होतात. (६।३१) अशा अवस्थेत भक्त कोण्याही प्राण्याला उद्वेग कसा पोचवू शकतो? तरीपण भक्तांच्या चरित्रामध्ये हे पाहण्यात येते की, त्यांचा महिमा, आदर-सत्कार तसेच कुठे कुठे त्यांच्या क्रिया, एव्हढेच नव्हेतर त्यांची केवळ सौम्य आकृती पाहूनही काही लोक ईर्ष्यावश होऊन उद्विग्न होतात आणि भक्तांशी अकारण द्वेष आणि विरोध करू लागतात.

भक्ताविषयी लोकांना जो उद्वेग होतो, त्यासंबंधी विचार केला तर, असेच आढळून येईल की, भक्ताच्या क्रिया कधीही कोणाच्या उद्वेगाला कारण होत नाहीत. कारण भक्त प्राणीमात्रात भगवंतालाच पाहत असतो—"**वासुदेवः सर्वम्**" (७।१९). त्याच्या संपूर्ण क्रिया स्वाभाविकच प्राण्यांच्या परम हितासाठीच असतात. त्याच्याकडून कधी चुकूनही कोणाच्या अहिताविषयी क्रिया होत नाही. ज्यांना त्यांच्याविषयी उद्वेग होतो, तो त्यांच्या स्वतःच्या राग-द्वेषयुक्त आसुरी स्वभावामुळेच होत असतो. स्वतःच्याच दोषयुक्त स्वभावामुळे त्यांना भक्ताच्या हितकारी क्रियासुद्धा उद्वेगजनक प्रतीत होतात. यात भक्ताचा काय दोष आहे? भर्तृहरिजी म्हणतात—

**मृगमीनसज्जनानां तृणजलसंतोषविहितवृत्तीनाम्।**
**लुब्धकधीवरपिशुना निष्कारणवैरिणो जगति॥**

(भर्तृहरि नीतिशतक ६१)

"हरिण, मासा आणि सज्जन क्रमाने तृण, जल आणि संतोषावर आपला जीवननिर्वाह करतात (कुणाला काही म्हणत नाहीत) परंतु व्याध, कोळी आणि दुष्टलोक त्यांच्याशी अकारणच वैर करतात".

वास्तविक, भक्ताकडून दुसरा मनुष्य उद्विग्न होतो, हा प्रश्नच उद्भवत नाही तर भक्तांच्या चरित्रात असे प्रसंग पाहण्यात येतात की, त्यांच्याशी द्वेष करणारे लोकसुद्धा त्यांचे चिंतन आणि सङ्ग-दर्शन-स्पर्श-वार्तालाप, यांच्या प्रभावाने आपल्या आसुरी स्वभावाचा त्याग करून भक्त झाले. असे होण्यात भक्तांचा उदारतेने परिपूर्ण असलेला स्वभावच कारण आहे—

"**उमा संत कइ इहइ बड़ाई। मंद करत जो करइ भलाई**"॥

(मानस ५/४१/४).

परंतु भक्तांशी द्वेष करणाऱ्या सर्व लोकांना लाभच होतो, असा काही नियम नाही.

जर असे मानले की, भक्ताकडून कोणाला उद्वेग होत-च नाही अथवा दुसरे लोक भक्ताविरुद्ध कोणते वर्तन करत-च नाहीत अथवा भक्ताचे शत्रू-मित्र नसतातच, तर मग भक्ता-साठी शत्रू-मित्र, मान-अपमान, निंदा-स्तुती, इत्यादीत सम राहण्याविषयी (जे पुढे अठराव्या एकोणीसाव्या श्लोकात सांगितले गेले आहे) म्हटले गेले नसते. तात्पर्य, लोकांना आपल्या आसुरी स्वभावामुळे भक्ताच्या हितकर क्रियांपासून-ही उद्वेग होऊ शकतो आणि ते बदला घेण्याच्या भावनेने भक्ताविरुद्ध वर्तन करू शकतात, तसेच स्वतःला भक्ताचा शत्रू मानू शकतात, परंतु भक्ताच्या दृष्टीत कोणी शत्रू नसतो आणि कोणाला उद्विग्न करण्याचा त्याचा भाव नसतोच.

**लोकान्नोद्विजते च यः**—पूर्वी भगवंतांनी सांगितले की, भक्ताकडून कोण्याही प्राण्याला उद्वेग होत नाही आणि आता उपर्युक्त पदांनी म्हणतात की, स्वतः भक्तालाही कोण्या प्राण्याकडून उद्वेग होत नाही. याची दोन कारणे आहेत.

(१) भक्ताच्या शरीर, मन, इंद्रिये, सिद्धांत इत्यादीच्या विरुद्धही अनिच्छा अथवा परेच्छेने क्रिया आणि घटना होऊ शकतात. परंतु वास्तविकतेचा बोध झाल्याने तसेच भगवंता-विषयी अत्यंत प्रेम झाल्याकारणाने भक्त भगवत्प्रेमात इतका मग्न राहतो की, त्याला सर्वत्र आणि सर्वांत भगवंताचेच दर्शन होत असते. म्हणून प्राणीमात्राच्या क्रियेत (मग त्या क्रिया त्याच्या प्रतिकूल का असेनात) त्याला भगवंताचीच लीला दिसत असते. म्हणून त्याला कोणत्याही क्रियेपासून कधी उद्वेग होत नाही.

(२) मनुष्याला दुसऱ्याकडून, जेव्हा त्याच्या कामना, मान्यता, साधना, धारणा इत्यादींना विरोध होतो तेव्हाच त्याला उद्वेग होतो. भक्त सर्वथा पूर्णकाम असतो. म्हणून त्याला दुसऱ्याकडून उद्विग्न होण्याचे काही कारणच राहत नाही.

**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः**—येथे हर्षा-पासून मुक्त होण्याचे तात्पर्य, सिद्ध भक्त सर्व प्रकारच्या हर्षादी विकारापासून सर्वथारहित असतात. परंतु याचा आशय असा नाही की, सिद्ध भक्त सर्वथा हर्षरहित (प्रसन्नता शून्य) असतो, तर त्याची प्रसन्नता नित्य, एकरस, विलक्षण आणि अलौकिक असते. मात्र त्याची प्रसन्नता, सांसारिक पदार्थांच्या संयोग-वियोगाने उत्पन्न झालेली क्षणिक, नाशवान, तसेच कमी-जास्त होणारी नसते. सर्वत्र भगवद्बुद्धी असल्याने एकमात्र आपल्या इष्ट भगवंतांना आणि त्यांच्या लीलांना वारंवार पाहून तो नेहमीच प्रसन्न राहत असतो.

एखाद्याच्या उत्कर्षाला (उन्नतीला) सहन न करणे ह्याला "अमर्ष" म्हटले जाते. दुसऱ्या लोकांना आपल्या-

सारखे अथवा आपल्यापेक्षा अधिक सुख-सुविधा, धन, विद्या, महिमा, आदर-सत्कार इत्यादी प्राप्त झालेले पाहून सामान्य मनुष्याच्या अंतःकरणात, त्यांच्याविषयी ईर्ष्या होऊ लागते, कारण त्याला दुसऱ्यांचा उत्कर्ष सहन होत नाही.

कित्येक वेळी काही साधकांच्या अंतःकरणातही दुसऱ्या साधकांची अध्यात्मिक उन्नती आणि प्रसन्नता पाहून अथवा ऐकून किंचित् ईर्ष्याचा भाव उत्पन्न होतो. परंतु भक्त या विकारापासून संपूर्णपणे रहित असतो, कारण त्याच्या दृष्टीत आपल्या प्रिय प्रभूशिवाय अन्य कोणाची स्वतंत्र सत्ता राहतच नाही. तर मग तो कोणाविषयी अमर्ष का करील आणि कशासाठी करील?

जर साधकाच्या अंतःकरणात दुसऱ्यांची अध्यात्मिक उन्नती पाहून असा भाव उत्पन्न होत असेल की, माझीही अशीच अध्यात्मिक उन्नती व्हावी, तर असा भाव त्याच्या साधनेला सहायक होईल. परंतु जर साधकाच्या अंतः-करणात असा भाव उत्पन्न होत असेल की, याची उन्नती का झाली, तर अशा दुर्भावामुळे त्याच्या अंतःकरणात अमर्षाचा भाव निर्माण होईल जो त्याला पतनाकडे घेऊन जाईल.

इष्टाचा वियोग आणि अनिष्टाचा संयोग होण्याच्या शंके-मुळे होणाऱ्या विकाराला "भय" म्हणतात. भय दोन कारणांनी होत असते (१) बाह्य कारणांनी, जसे सिंह, सर्प, चोर, डाकू इत्यादीकडून अनिष्ट होण्याची अथवा कोणत्याही प्रकारची सांसारिक हानी होण्याची शंका आल्याने होणारे भय (२) आंतरिक कारणांनी, जसे-चोरी, असत्य, कपट, व्यभिचार इत्यादी शास्त्र-विरुद्ध भाव तसेच आचरणाने होणारे भय!

सर्वात मोठे भय मृत्यूचे असते. विवेकी म्हणविणाऱ्या पुरुषांनासुद्धा प्रायः मृत्यूचे भय वाटते. *साधकालाही प्रायः सत्संग-भजन-ध्यानादी साधनांनी शरीर कृश होणे इत्यादीचे भय राहते. त्याला कधी कधी याचीही भीती वाटते की, संसाराविषयी सर्वथा वैराग्य झाल्यास माझ्या शरीराचे व परिवाराचे पालन कसे होईल! साधारण मनुष्याला अनुकूल वस्तूच्या प्राप्तीमध्ये बाधा आणणाऱ्या आपल्यापेक्षा बलवान मनुष्याकडून भय असते. ही सर्व भीती केवळ शरीराच्या (जडता) आश्रयानेच उत्पन्न होत असते. भक्त संपूर्णपणे भगवच्चरणाच्या आश्रित राहतो, म्हणून तो सदा सर्वदा भय-रहित असतो. साधकालाही, जोपर्यंत तो सर्वथा भवच्चरणाच्या आश्रित होत नाही, तोपर्यंत भय राहते.

सिद्ध भक्ताला तर सदा, सर्वत्र आपल्या प्रिय प्रभूचीच लीला दिसत असते. मग भगवंताची लीला त्याच्या अंतः-करणात भय कसे निर्माण करू शकेल?

मनाची एकाग्रता न राहता त्याची हालचाल होणे "उद्वेग" म्हणविला जातो. या (पंधराव्या) श्लोकात "उद्वेग" शब्द तीन वेळ आला आहे. प्रथम आलेल्या उद्वेग शब्दाने भगवंतांनी असे सांगितले की, भक्ताकडून झालेली कोणतीही क्रिया कोणत्याही मनुष्याच्या उद्वेगाला कारण होत नाही. दुसऱ्या वेळी सांगितले की, दुसऱ्या मनुष्याच्या कोणत्याही क्रियेने भक्ताच्या अंतःकरणात उद्वेग निर्माण होत नाही. याशिवाय दुसऱ्या कित्येक कारणांनीही मनुष्याला उद्वेग होऊ शकतो. जसे वारंवार प्रयत्न करूनही आपले कार्य पूर्ण न होणे, कार्याचे फल इच्छेनुसार न मिळणे, अनिच्छेने ऋतु परिवर्तन, भूकंप, पूर इत्यादी दुःखदायक घटना घडणे, आपली कामना, मान्यता, सिद्धांत अथवा साधनेत विघ्न निर्माण होणे इत्यादी. भक्त या सर्व प्रकारच्या उद्वेगापासून सर्वथा मुक्त असतो—हे सांगण्यासाठीच तीसऱ्या वेळी "उद्वेग" शब्द आला आहे. तात्पर्य, भक्तांच्या अंतःकरणात "उद्वेग" नावाची स्थिती मुळीच नसते.

उद्वेग होण्यात अज्ञानजनित इच्छा आणि आसुरीभाव-च कारण असतो. भक्ताच्या ठिकाणी अज्ञानाचा सर्वथा अभाव झाल्याने, कोणती स्वतंत्र इच्छा राहत नसते, मग आसुरी स्वभाव तर साधनावस्थेतच नष्ट होतो. भगवंताची इच्छाच भक्ताची इच्छा होत असते. भक्त आपल्या क्रियेच्या फलरूपात अथवा अनिच्छेने प्राप्त झालेल्या अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीत, भगवंताच्या कृपेने परिपूर्ण असलेले विधानच पाहत असतो आणि निरंतर आनंदात मग्न असतो. म्हणून भक्ताचे ठिकाणी उद्वेगाचा संपूर्णपणे अभाव असतो.

**मुक्तः**—या पदाचा अर्थ, विकारापासून संपूर्णपणे रहित झालेला, असा आहे. अंतःकरणात संसाराचा आदर राहिल्याने अर्थात् परमात्म्याच्या ठिकाणी पूर्णपणे मन-बुद्धी तल्लीन न झाल्यानेच हर्ष, अमर्ष, भय, उद्वेग इत्यादी विकार उत्पन्न होतात. परंतु भक्ताच्या दृष्टीत एका भगवंताशिवाय अन्य कोणाची स्वतंत्र सत्ता आणि महत्ता राहत नसल्याने त्याचे ठिकाणी हे विकार उत्पन्नच होत नाहीत, तर स्वाभाविकच सद्गुण सदाचार राहत असतात.

या श्लोकात भगवंतांनी "**भक्तः**" पद न देता "**मुक्तः**" पद दिले आहे. याचे तात्पर्य, भक्त सर्व दुर्गुण-दुराचारापासून सर्वथा रहित असतो.

गुणांचा अभिमान झाल्याने दुर्गुण आपोआप निर्माण होतात. आपल्यात कोणता गुण निर्माण झाला असता,

* स्वरसवाही विदुषोऽपि तथारुढोऽभिनिवेशः॥ (पातञ्जलयोगदर्शन २।९)

अभिमानरूपी दुर्गुण उत्पन्न झाला तर त्या गुणाला गुण कसे मानले जाऊ शकते ? दैवी संपत्ती (सद्गुण) पासून कधी-ही आसुरी संपत्ती (दुर्गुण) उत्पन्न होऊ शकत नाही. जर दैवी संपत्तीपासून आसुरी संपत्तीची उत्पत्ती झाली असती, तर "**दैवी सम्पद्विमोक्षाय**" (१६।५) या भगवद्वचनानुसार मनुष्य मुक्त कसा झाला असता ? वास्तविक गुणाच्या अभिमानात गुण कमी आणि दुर्गुणच (अभिमान) अधिक असतात, अभिमानाने दुर्गुणाची वृद्धी होत असते. कारण सर्व दुर्गुण-दुराचार अभिमानाच्या आश्रित राहतात.

भक्ताला तर बहुतेक याची जाणीवही नसते की, माझ्यात काही गुण आहेत. जर त्याला आपल्यात कधी काळी कोणता गुण दिसला तरी, त्या गुणाला तो भगवंताचाच मानतो, आपला मानत नाही. अशा प्रकारे गुणाचा अभिमान नसल्याकारणाने भक्त सर्वच दुर्गुण दुराचारापासून, विकारापासून मुक्त असतो.

भक्ताला भगवान् प्रिय असतात म्हणून भगवंतालाही भक्त प्रिय असतात (७।१७)

**परिशिष्ट भाव**—दुसऱ्याला सत्ता दिसल्यानेच उद्वेग, ईर्ष्या, भय इत्यादी होतात. भक्ताच्या दृष्टीत एका भगवंताशिवाय दुसरी कोणती सत्ता नाहीच, मग तो कोणाशी उद्वेग, इर्ष्या, भय इत्यादी करेल आणि का करेल?—***'निज प्रभुमय देखहिं जगत केहि सन करहिं बिरोध'*** (मानस, उत्तर० ११२ ख)

***संबंध***—*सिद्ध भक्तांची सहा लक्षणे सांगणारे तीसरे प्रकरण पुढील श्लोकात आले आहे.*

## अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः।
## सर्वारम्भपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः॥१६॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यः** | = जो | **उदासीनः** | = उदासीन, | | सर्वथा त्यागी आहे, |
| **अनपेक्ष** | = अपेक्षारहित, | **गतव्यथः** | = व्यथारहित (आणि) | **सः** | = तो |
| **शुचिः** | = (अंतर्बाह्य) पवित्र, | **सर्वारम्भ-परित्यागी** | = सर्वच आरंभांचा अर्थात् नव-नवीन कर्मांच्या आरंभांचा | **मद्भक्तः** | = माझा भक्त |
| **दक्षः** | = चतुर, | | | **मे** | = मला |
| | | | | **प्रियः** | = प्रिय आहे. |

***व्याख्या***— **अनपेक्षः**—भक्त भगवंतालाच सर्वश्रेष्ठ मानतो. त्याच्या दृष्टीत भगवत्प्राप्तीपेक्षा अधिक श्रेष्ठ दुसरा कोणताही लाभ नसतो. म्हणून संसाराच्या कोणत्याही वस्तूत त्याचे किंचिन्मात्रही आकर्षण नसते. एवढेच नव्हे, तर आपले म्हणविले जाणारे शरीर, इंद्रिय, मन, बुद्धीतही त्याचा आपलेपणा राहत नाही, तर त्यांनाही तो भगवंताचेच समजतो, जे वास्तविक भगवंताचेच आहेत. म्हणून त्याला शरीर-निर्वाहाचीही चिंता राहत नाही. तर मग तो कोणत्या गोष्टीची अपेक्षा करील? अर्थात् मग त्याला कोणत्याही वस्तूची इच्छा-वासना-स्पृहा राहत नाही.

भक्तावर कितीही मोठी आपत्ती आली तरी आपत्तीचे ज्ञान असूनही त्याच्या चित्तावर प्रतिकूल प्रभाव पडत नाही. भयंकराती भयंकर परिस्थितीतही तो भगवंताच्या लीलेचा अनुभव करून मस्त राहत असतो. म्हणून तो कोणत्याही प्रकारच्या अनुकूलतेची कामना करीत नाही.

नाशवान् पदार्थ तर राहत नाहीत, त्यांचा वियोग अवश्यंभावी आहे आणि अविनाशी परमात्म्यापासून कधी वियोग होतच नाही—या वास्तविकतेला जाणून घेतल्यामुळे भक्ताचे ठिकाणी स्वाभाविकच नाशवान् पदार्थांची इच्छा उत्पन्न होत नाही.

ही गोष्ट विशेष लक्षात ठेवण्यासारखी आहे की, केवळ इच्छा केल्याने शरीरनिर्वाहाचे पदार्थ मिळत असतात आणि इच्छा न केल्याने मिळत नसतात, असा काही नियम नाही. वास्तविक शरीरनिर्वाहाची आवश्यक सामुग्री आपोआप प्राप्त होत असते, कारण प्रत्येक जीवाच्या शरीर-निर्वाहाच्या आवश्यक सामुग्रीची व्यवस्था अगोदरच भगवंताकडून झालेली असते. इच्छा केल्याने तर आवश्यक वस्तूंच्या प्राप्तीत बाधाच येत असते. जर मनुष्याने एखाद्या वस्तूला आपल्यासाठी अत्यंत आवश्यक समजून "ती वस्तु कशी मिळेल? कुठे मिळेल? केव्हा मिळेल?" अशा प्रबल इच्छेला आपल्या अंतःकरणात पकडून ठेवले तर, त्याच्या त्या इच्छेचा विस्तार होऊ शकत नाही अर्थात् त्याची ती इच्छा दुसऱ्या लोकांच्या अंतःकरणापर्यंत पोहचू शकत नाही. ह्या कारणाने दुसऱ्या लोकांच्या अंतःकरणात ती आवश्यक वस्तू देण्याची इच्छा अथवा प्रेरणा होत नाही. बहुधा असे दिसून येते की, घेण्याची प्रबल इच्छा ठेवणाऱ्याला (चोर इत्यादीना) कोणी देऊ इच्छित नाही. या उलट कोणत्याही वस्तूची इच्छा न ठेवणाऱ्या विरक्त त्यागी आणि बालकाच्या

आवश्यकतेचा अनुभव आपोआप दुसऱ्याला होतो आणि ते त्यांच्या शरीरनिर्वाहाची आपोआप प्रसन्नतेने व्यवस्था करतात. यावरुन हे सिद्ध झाले की, इच्छा न केल्याने जीवन-निर्वाहाच्या आवश्यक वस्तू न मागता आपोआप मिळत असतात. म्हणून वस्तूंची इच्छा करणे केवळ मूर्खपणा आहे आणि निष्कारण दुःख ओढवून घेणे आहे. सिद्ध भक्ताला तर आपले म्हणविले जाणाऱ्या शरीराचीही अपेक्षा नसते, म्हणून तो सर्वथा निरपेक्ष असतो.

काही भक्तांना तर भगवंतांनी दर्शन द्यावे, याचीही अपेक्षा राहत नाही. भगवंतांनी दर्शन दिले तरी आनंद आणि न दिले तरीही आनंद! तो तर नेहमी भगवंताच्या प्रसन्नतेला आणि कृपेला पाहून मस्त राहत असतो. अशा निरपेक्ष भक्ताच्या मागे-मागे स्वतः भगवान्‌ही फिरत असतात. भगवान् स्वतः म्हणतात—

**निरपेक्षं मुनिं शान्तं निर्वैरं समदर्शनम्।**
**अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यङ्घ्रिरेणुभिः॥**

(श्रीमद्भा० ११। १४। १६)

"जो निरपेक्ष (कोणाचीही अपेक्षा न ठेवणारा), निरंतर माझे मनन करणारा, शांत, द्वेषरहित आणि सर्वांविषयी समदृष्टी ठेवणारा आहे, त्या महात्म्याच्या मागे-मागे मी सदा अशा विचाराने फिरत असतो की, त्याचे चरण-रज माझ्यावर पडावे आणि मी पवित्र व्हावे"

कोणत्याही वस्तूची इच्छा मनात ठेवून भगवद्‌भक्ती करणारा मनुष्य वास्तविक त्या इच्छित वस्तूचाच भक्त असतो कारण (वस्तूकडेच सर्व लक्ष राहिल्याने) तो वस्तूसाठीच भगवंताची भक्ती करत असतो, भगवंतासाठी नव्हे. परंतु भगवंताची ही उदारता असते की, त्यालाही आपला भक्त मानतात (७। १६), कारण तो इच्छित वस्तूसाठी, दुसऱ्या कोणावरही भरवसा न ठेवता, अर्थात् केवळ भगवंतावरच भरवसा ठेवून भजन करतो. एवढेच नव्हे तर, भगवान् भक्त ध्रुवाप्रमाणे त्या (अर्थार्थी भक्त) ची इच्छा पूर्ण करून त्याला संपूर्णपणे निःस्पृहही बनवितात.

**शुचिः**—शरीराविषयी अहंता-ममता (मी, माझेपणा) न राहिल्याने, भक्ताचे शरीर अत्यंत पवित्र असते. अंतःकरणात राग-द्वेष, हर्ष-शोक, काम-क्रोधादी विकार न राहिल्यामुळे, त्याचे अंतःकरणही अत्यंत पवित्र असते. अशा (अंतर्बाह्य पवित्र) भक्ताचे दर्शन, स्पर्श, वार्तालाप आणि चिंतनाने दुसरे लोकही पवित्र होतात. तीर्थ सर्व लोकांना पवित्र करतात, परंतु असे भक्त तीर्थांना तीर्थत्व प्रदान करतात; अर्थात् तीर्थ-ही त्यांच्या चरण-स्पर्शाने पवित्र होतात. (परंतु भक्ताच्या मनात असा अहंकार नसतो). असे भक्त आपल्या हृदयाचे ठिकाणी विद्यमान असलेल्या (**"पवित्राणां पवित्रम्"** पवित्रांना ही पवित्र करणारे) भगवंताच्या प्रभावाने तीर्थांनाही महातीर्थता प्रदान करत हिंडत असतात—

**तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि स्वान्तःस्थेन गदाभृता॥**

(श्रीमद्भा० १। १३। १०)

महाराज भगीरथ गंगेला उद्देशून म्हणतात—

**साधवो न्यासिनः शान्ता ब्रह्मिष्ठा लोकपावनाः।**
**हरन्त्यघं तेऽङ्गसङ्गात् तेष्वास्ते ह्यघभिद्धरिः॥**

(श्रीमद्भा० ९। ९। ६)

"माते, ज्यांनी इहलोकातील आणि परलोकातील संपूर्ण कामनांचा त्याग केला आहे, जे संसारापासून उपरत होऊन आपल्या स्वतःमध्ये शांत आहेत, जे ब्रह्मनिष्ठ आणि लोकांना पवित्र करणारे परोपकारी साधुपुरुष आहेत, ते आपल्या अंगस्पर्शाने तुमच्या (पाप्यांच्या अंगस्पर्शाने आलेल्या) सर्व पापांना नष्ट करून टाकतील, कारण त्यांच्या हृदयात संपूर्ण पापांना नाश करणारे भगवान् सदा सर्वदा निवास करत असतात."

**दक्षः**—ज्याने करण्यायोग्य काम करून टाकले आहे, तोच दक्ष आहे. मानव जीवनाचा उद्देश भगवत्प्राप्तीच आहे. यासाठीच मनुष्यशरीर मिळालेले आहे. म्हणून ज्याने आपला उद्देश पूर्ण केला आहे अर्थात् भगवत्प्राप्ती करून घेतली आहे, तोच वास्तविक दक्ष अर्थात् चतुर आहे. भगवान् म्हणतात—

**एषा बुद्धिमतां बुद्धिर्मनीषा च मनीषिणाम्।**
**यत्सत्यमनृतेनेह मर्त्येनाप्नोति मामृतम्॥**

(श्रीमद्भा० ११। २९। २२)

विवेकियांचा विवेक आणि चतुरांच्या चातुर्याची पराकाष्ठा यातच आहे की, त्यांनी या विनाशी आणि असत्य शरीराकडून अविनाशी असलेल्या मला तसेच सत्य तत्त्वाला प्राप्त करून घ्यावे.

सांसारिक दक्षता (चतुराई) वास्तविक दक्षता नव्हे. एका दृष्टीने तर व्यवहारात अधिक दक्ष असणे कलंकच आहे, कारण यामुळे अंतःकरणात जड पदार्थांचा आदर वाढत राहतो, जो मनुष्याच्या पतनाला कारण होतो.

सिद्ध भक्तात व्यावहारिक (सांसारिक) दक्षताही असते. परंतु व्यावहारिक दक्षतेला पारमार्थिक स्थितीची कसोटी मानणे, वास्तविक सिद्ध भक्ताचा अपमानच करणे आहे.

**उदासीनः**—उदासीन शब्दाचा अर्थ, उत्+आसीन

अर्थात् वर बसलेला, तटस्थ, पक्षपातरहित, असा आहे.

विवाद करणाऱ्या दोन व्यक्तींविषयी, ज्याचा संपूर्णपणे तटस्थ भाव राहतो, त्याला "उदासीन" म्हटले जाते. उदासीन शब्द निर्लिप्तताचे द्योतक आहे. जसे पर्वताच्या उंच शिखरावर उभे असलेल्या पुरुषावर खाली पृथ्वीवर लागलेल्या आगीचा अथवा नदीला आलेल्या पुराचा काहीही परिणाम होत नाही, तसेच कोणत्याही अवस्था, घटना, परिस्थिती, इत्यादीचा भक्तावर कोणताही परिणाम होत नाही, तो सदा निर्लिप्त राहत असतो.

जो मनुष्य भक्ताचे हित इच्छितो, तसेच त्याच्या अनुकूल आचरण करतो तो त्याचा मित्र समजला जातो आणि जो मनुष्य भक्ताचे अहित इच्छितो, तसेच त्याच्या प्रतिकूल आचरण करतो, तो त्याचा शत्रू समजला जातो. अशा प्रकारे मित्र आणि शत्रू समजले जाणाऱ्या व्यक्तींशी भक्ताच्या बाह्य व्यवहारात फरक वाटू शकतो, परंतु भक्ताच्या अंत:करणात दोन्ही मनुष्याविषयी किंचित्मात्रही भेदभाव नसतो. तो दोन्ही स्थितीत सर्वथा उदासीन अर्थात् निर्लिप्त राहत असतो.

भक्ताच्या अंत:करणात आपली स्वतंत्र सत्ता राहत नसते. तो शरीरासह संपूर्ण संसाराला परमात्म्याचेच मानतो. म्हणून त्याचा व्यवहार पक्षपातरहित असतो.

**गतव्यथः**—काही मिळो अथवा न मिळो, काही येवो की जावो, ज्याच्या चित्तात दु:ख, चिंता-शोकरूपी हालचाल कधी होतच नाही, त्या भक्ताला येथे "**गतव्यथः**" म्हटले गेले आहे.

येथे "**व्यथा**" शब्द केवळ दु:खाचा वाचक नाही. अनुकूलतेची प्राप्ती झाल्यावर चित्तात प्रसन्नता तसेच प्रतिकूलतेची प्राप्ती झाल्यावर चित्तात खिन्नतेची जी हालचाल होते, ती देखील "व्यथा" च आहे. म्हणून अनुकूलता तसेच प्रतिकूलतेने अंत:करणात होणारे राग-द्वेष, हर्ष-शोक, इत्यादी विकारांच्या सर्वथा अभावालाच येथे "**गतव्यथः**" पदाने म्हटले गेले आहे.

**सर्वारम्भपरित्यागी**—भोग आणि संग्रहाच्या उद्देशाने नवीन-नवीन कर्म करण्याला "आरंभ" म्हणतात. जसे सुख-भोगाच्या इच्छेने घरात नव-नव्या वस्तू एकत्र करणे, वस्त्र खरेदी करणे, धन-वृद्धीच्या उद्देशाने नव-नवीन दुकाने चालू करणे, नवीन व्यापार सुरू करणे इत्यादी! भक्त भोग आणि संग्रहासाठी केल्या जाणाऱ्या सर्व कर्मांचा सर्वथैव त्यागी असतो.*

ज्याचा उद्देश संसार आहे आणि जो वर्ण, आश्रम, विद्या, बुद्धी, योग्यता, पद, अधिकार इत्यादीच्या अनुषंगाने आपल्यात विशेषता पाहतो, तो भक्त नसतो. भक्त भगवन्निष्ठ असतो. म्हणून त्याचे म्हणविले जाणारे, शरीर, इंद्रिय, मन, बुद्धी, क्रिया, फल इत्यादी सर्व भगवंताना अर्पित होतात. वास्तविक या शरीरादीचे मालक भगवानच आहेत. प्रकृती आणि प्रकृतीचे संपूर्ण कार्य भगवंताचे आहे. म्हणून भक्त एका भगवंताशिवाय कोणालाही आपले समजत नाही. तो आपल्यासाठी काहीही करत नाही. त्याच्याकडून होणारे संपूर्ण कर्म भगवंताच्या प्रसन्नतेसाठीच होतात. धन-संपत्ती, सुख-आराम, मान-सन्मान, इत्यादीसाठी केले जाणारे कर्म त्याच्याकडून कधी होतच नाहीत.

ज्याच्या अंत:करणात परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीची खरी तळमळ लागून राहिली आहे, तो साधक मग कोणत्याही मार्गाचा का असेना, भोग भोगणे आणि संग्रह करण्याच्या उद्देशाने तो कधी कोणते नवीन कर्म आरंभ करत नाही.

**यो मद्भक्तः स मे प्रियः**—भगवंताचे ठिकाणी स्वाभाविकच इतके महान आकर्षण आहे की, भक्त आपोआप त्यांच्याकडे ओढला जातो, त्यांचा प्रेमी होतो.

**आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रन्था अप्युरुक्रमे।**
**कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थम्भूतगुणो हरिः॥**

(श्रीमद्भा० १। ७। १०)

ज्ञानाद्वारा ज्यांची चित्-जड-ग्रंथी तुटली गेली आहे, असे आत्माराम मुनिगणसुद्धा भगवंताची हेतुरहित (निष्काम) भक्ती करत असतात. कारण भगवंताचे गुणच असे आहेत की, ते प्राण्यांना आपल्याकडे ओढून घेतात.

येथे असा प्रश्न होऊ शकतो की, जर भगवंताचे ठिकाणी इतके महान आकर्षण आहे, तर मग सर्व माणसे भगवंताकडे का ओढली जात नाहीत, त्यांचे प्रेमी का होत नाहीत ?

वास्तविक पाहिले असता, जीव भगवंताचाच अंश आहे. म्हणून त्याचे भगवंताकडे सहज स्वाभाविक आकर्षण असते. परंतु जे भगवान् वास्तविक आपले आहेत, त्यांना तर मनुष्याने आपले मानले नाही आणि जे मन-बुद्धी-इंद्रिये-शरीर-कुटुंबादी आपले नव्हेत, त्यांना जीवाने आपले मानले. म्हणूनच तो शारीरिक निर्वाह आणि सुखाच्या कामनेने सांसारिक भोगाकडे आकृष्ट झाला आणि आपल्या अंशी भगवंतापासून दूर (विमुख) झाला. असे असले तरी,

* अनारंभ अनिकेत अमानी। अनघ अरोष दच्छ बिग्यानी॥ (मानस ७/४६/३)

त्याची दूरता खरी समजू नये. कारण नाशवान् भोगाकडे आकृष्ट झाल्याने, त्याची भगवंतापासून **दूरता** झालेली तर दिसून येते; परंतु वास्तविक **दूरता** नाहीच, कारण त्या भोगातसुद्धा सर्वव्यापी परिपूर्ण भगवान् विद्यमान आहेत. परंतु इंद्रियांच्या विषयामध्ये अर्थात् भोगातच आसक्ती असल्याकारणाने, त्याला त्यात अव्यक्तरूपाने असलेले भगवान्, दिसत नाहीत. जेव्हा त्याचे या नाशवान् भोगाकडे असलेले आकर्षण समाप्त होते, तेव्हा तो आपोआपच भगवंताकडे ओढला जातो. संसारात किंचिन्मात्रही आसक्ती न राहिल्याने भक्ताचे एकमात्र भगवंताविषयी आपोआप प्रेम होते. अशा अनन्यप्रेमी भक्ताला भगवान् **''मद्भक्तः''** म्हणतात.

ज्या भक्ताचे भगवंताविषयी अनन्यप्रेम आहे, तो भगवंताला प्रिय असतो.

**परिशिष्ट भाव—'अनपेक्षः'**—अमुक वस्तू इत्यादी नसतील तर काम कसे चालेल—ही अपेक्षा भक्तात नसते. भक्ताच्या दृष्टीत सर्व काही भगवान्च भगवान् आहेत, मग तो कोणाकडून अपेक्षा करेल? **'शुचिः'**—भक्ताचे दर्शन, स्पर्श, भाषण दुसऱ्यांना शुद्ध करणारे असते. त्याच्या शरीराला स्पर्श करणारा वायूही शुद्ध असतो! जरी अशी शुद्धी ज्ञानयोगी महापुरुषातही असते, तरी भक्तात आरंभापासूनच सर्वांविषयी हितैषिता **( मैत्रः करुण एव च )** विशेषरूपाने असल्याने त्याच्यात विशेष शुद्धी असते. 'दक्षः'—भक्ताने करण्यायोग्य काम केले अर्थात् तो कृतकृत्य, ज्ञात-ज्ञातव्य आणि प्राप्त-प्राप्तव्य झाला, म्हणून तो 'दक्ष' आहे.

**'सर्वारम्भपरित्यागी'**—हे पद चौदाव्या अध्यायाच्या पंचविसाव्या श्लोकात गुणातीत महापुरुषासाठीही आले आहे—**'सर्वारम्भपरित्यागी गुणातीतः स उच्यते'** गुणातीत महापुरुषात कर्तृत्व नसल्या कारणाने तो सर्वारंभपरित्यागी असतो आणि भक्तात स्वार्थ आणि अभिमान नसल्यामुळे तो सर्वारंभपरित्यागी असतो. भक्ताला आपल्यासाठी काही करण्याचे शिल्लकच राहत नाही मग तो आरंभ काय करेल? त्याच्याद्वारा आरंभ होऊ शकतो, परंतु त्याच्यात त्याचे आकर्षण, आसक्ती, प्रयोजन, आग्रह राहत नाही. आरंभ झाला तरी ठीक आणि नाही झाला तरी ठीक! दोन्हीतही तो सम राहतो.

***संबंध***—*सिद्ध भक्ताच्या पाच लक्षणाचे चौथे प्रकरण पुढील श्लोकात आले आहे.*

## यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति।
## शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः॥१७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यः** | = जो (कधी) | **न** | = नाही, | | रहित) आहे, |
| **हृष्यति** | = हर्षित होत | **काङ्क्षति** | = कामना करीत | **सः** | = तो |
| **न** | = नाही, | **न** | = नाही (आणि) | **भक्तिमान्** | = भक्तिमान् मनुष्य |
| **द्वेष्टि** | = द्वेष करीत | **यः** | = जो | **मे** | = मला |
| **न** | = नाही, | **शुभाशुभ-परित्यागी** | = शुभाशुभ कर्मांहून पलीकडे गेला (संबंध- | **प्रियः** | = प्रिय आहे. |
| **शोचति** | = शोक करीत | | | | |

***व्याख्या—*** **यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति**—मुख्य विकार चार आहेत (१) आसक्ती (राग) (२) द्वेष (३) हर्ष आणि (४) शोक, *सिद्ध भक्तात हे चारही विकार नसतात. त्याचा असा अनुभव असतो की, संसाराचा प्रत्येक क्षणाला वियोग होत आहे आणि भगवंताशी कधी वियोग होतच नाही. संसाराशी कधी संयोग नव्हता, नाही, राहणार नाही आणि राहूही शकत नाही. म्हणून संसाराची कोणती स्वतंत्र सत्ता नसते—या वास्तविकतेचा अनुभव करून घेतल्यावर (जडतेचा कोणताही संबंध न राहिल्याने) भक्ताचा केवळ भगवंताशी आपला नित्यसिद्ध संबंधाचा अनुभव अटळरूपाने राहतो. यामुळे त्याचे अंतःकरण राग द्वेषादी विकारापासून संपूर्णपणे मुक्त होते. भगवंताचा साक्षात्कार झाला असता हे विकार संपूर्णपणे समाप्त होतात.

साधनावस्थेतही साधक जस-जसा साधनेत प्रगती करतो, तस-तसे त्याच्यातील राग-द्वेषादी विकार कमी होत जातात. जे कमी होणारे असते, ते समाप्तही होत असते. म्हणून साधनावस्थेतच जर विकार कमी होऊ लागतात, तर सहजच हे अनुमान केले जाऊ शकते की, सिद्ध अवस्थेत भक्ताचे ठिकाणी हे विकार राहत नाहीत, पूर्णपणे समाप्त होतात.

* प्रचलित भाषेत एखाद्याच्या मृत्यूने मनात होणाऱ्या व्यथेला ''शोक'' शब्दाचा प्रयोग केला जातो, परंतु येथे ''शोक'' शब्दाचे तात्पर्य अंतःकरणाच्या दुःखरूपी ''विकारा'' शी आहे.

हर्ष आणि शोक दोन्ही राग-द्वेषाचे परिणाम आहेत. ज्याच्याविषयी आसक्ती असते, त्याच्या संयोगाने आणि ज्याच्याविषयी द्वेष असतो, त्याच्या वियोगाने "हर्ष" होत असतो. या उलट ज्याच्याविषयी आसक्ती असते, त्याच्या वियोगाने किंवा वियोगाच्या शंकेने आणि ज्याच्याविषयी द्वेष असतो त्याच्या संयोगाने अथवा संयोगाच्या शंकेने "शोक" होतो. सिद्ध भक्ताच्या ठिकाणी राग-द्वेषाचा अत्यंत अभाव असल्याकारणाने, एक साम्यावस्था आपोआप निरंतर राहत असते. म्हणून तो विकारापासून संपूर्णपणे रहित असतो.

जसे रात्रीच्या वेळी अंधारात दिवा प्रज्वलित करण्याची कामना होत असते. दिवा प्रज्वलित केला तर हर्ष होतो, दिवा विझवणाऱ्याविषयी द्वेष अथवा क्रोध निर्माण होतो आणि पुन्हा दिवा कसा प्रज्वलित करावा अशी चिंता निर्माण होते. रात्र असल्यामुळे या चार गोष्टी घडतात. परंतु ज्यावेळी सूर्य माध्यान्हीला असतो, त्यावेळी दिवा प्रज्वलित करण्याची कामना होत नाही, दिवा उजळल्याने हर्ष होत नाही, दिवा विझवणाऱ्याविषयी द्वेष अथवा क्रोध निर्माण होत नाही आणि (अंधार नसल्याकारणाने) प्रकाशाच्या अभावाची चिंताही राहत नाही. त्याचप्रमाणे भगवंताशी विमुख आणि संसाराशी सम्मुख झाल्याने शरीर-निर्वाह आणि सुख ह्यासाठी अनुकूल पदार्थ, परिस्थिती इत्यादी मिळण्याची कामना होत असते, यांच्या मिळण्याने हर्ष होतो, यांच्या प्राप्तीत बाधा आणणाऱ्याविषयी द्वेष अथवा क्रोध निर्माण होतो आणि हे जर मिळाले नाहीत तर "कसे मिळतील?" अशी चिंता निर्माण होते. परंतु ज्याला (माध्यान्हीच्या सूर्याप्रमाणे) भगवत्प्राप्ती झालेली आहे, त्याचे ठिकाणी हे विकार कधीही नसतात तो पूर्णकाम होत असतो. म्हणून त्याला संसाराची कोणतीही आवश्यकता राहत नसते.

**शुभाशुभ परित्यागी**—ममता, आसक्ती, आणि फलेच्छारहित होऊनच शुभ कर्म केल्यामुळे भक्ताची कर्म "अकर्म" होतात. म्हणून भक्ताला शुभ कर्मांचाही त्यागी म्हटले गेले आहे. राग-द्वेषाचा संपूर्ण अभाव झाल्याकारणाने त्याचेकडून अशुभ कर्म होतच नाहीत. अशुभ कर्म होण्यात कामना, ममता, आसक्तीच प्रधान कारण असते आणि भक्तात यांचा संपूर्णपणे अभाव असतो. म्हणून त्याला अशुभ कर्मांचाही त्यागी म्हटले गेले आहे.

भक्त शुभ कर्माची तर आसक्ती ठेवत नाही आणि अशुभ कर्मांचा द्वेष करत नाही. त्याचेकडून स्वाभाविक शास्त्रविहित शुभ कर्मांचे आचरण आणि अशुभ (निषिद्ध तसेच काम्य) कर्मांचा त्याग होत असतो, राग-द्वेषपूर्वक नव्हे. राग-द्वेषाचा संपूर्णपणे त्याग करणाराच खरा त्यागी आहे.

मनुष्याला कर्म बंधनकारक नसतात, तर कर्माविषयी असलेले राग-द्वेषच बंधनकारक असतात. भक्ताची संपूर्ण कर्म राग-द्वेषरहित होत असतात, म्हणून तो शुभाशुभ संपूर्ण कर्मांचा परित्यागी आहे.

"**शुभाशुभपरित्यागी**" पदाचा अर्थ, शुभ आणि अशुभ कर्मांच्या फलाचा त्यागीही घेतला जाऊ शकतो. परंतु याच श्लोकाच्या पूर्वार्धात आलेल्या "**न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति**" पदांचा संबंधही शुभ (अनुकूल) आणि अशुभ (प्रतिकूल) कर्मफलाच्या त्यागाशीच आहे. म्हणून येथे "**शुभाशुभपरित्यागी**" पदाचा अर्थ शुभाशुभ कर्मफलाचा त्यागी मानल्याने पुनरूक्ती दोष येतो. म्हणून या पदाचा अर्थ शुभ आणि अशुभ कर्माविषयी राग-द्वेषाचा त्यागी असाच मानला पाहिजे.

**भक्तिमान्यः स मे प्रियः**—भक्ताची भगवंताविषयी अत्यधिक प्रियता असते. त्याच्याकडून आपोआप स्वाभाविक भगवंताचे चिंतन, स्मरण, भजन होत राहते. अशा भक्ताला येथे "**भक्तिमान्**" म्हटले गेले आहे.

भक्ताचे भगवंताचे ठिकाणी अनन्यप्रेम असते, म्हणून तो भगवंताला प्रिय होत असतो.

**परिशिष्ट भाव**—हर्ष ( **हृष्यति** ) आणि शोक ( **शोचति** ), राग ( **काङ्क्षति** ) आणि द्वेष ( **द्वेषि** )—ही द्वन्द्व आहेत. भक्तात कोणतेही द्वन्द्व राहत नाही, तो निर्द्वन्द्व होतो. नारदभक्तिसूत्रात आले आहे—**यत्प्राप्य किञ्चिद्वाञ्छति न शोचति न द्वेष्टी न रमते नोत्साही भवति॥ ५॥**

'जी भक्ती प्राप्त झाली असता भक्त कोणत्याही वस्तूची इच्छा करीत नाही, शोक करीत नाही, द्वेष करीत नाही, कोणत्या वस्तूत आसक्त होत नाही किंवा त्याला कोणत्या वस्तूच्या प्राप्तीत उत्साह (हर्ष) होत नाही.'

***संबंध**—आता पुढील दोन श्लोकांत सिद्ध भक्ताच्या दहा लक्षणाचे पांचवे आणि शेवटचे प्रकरण सांगत आहेत.*

## समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः।
## शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः॥ १८॥

**तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी सन्तुष्टो येन केनचित्।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः॥१९॥**

**शत्रौ** = (जो) शत्रू
**च** = आणि
**मित्रे** = मित्र यात
**तथा** = तसेच
**मानापमानयोः** = मान-अपमान यात
**समः** = सम आहे (आणि)
**शीतोष्ण-सुखदुःखेषु** = शीत-उष्ण (शरीराची अनुकूलता-प्रतिकूलता) तसेच सुख-दुःख (मन-बुद्धीची अनुकूलता-प्रतिकूलता) यात
**समः** = सम आहे
**च** = आणि
**सङ्गविवर्जितः** = आसक्तिरहित आहे (आणि)
**तुल्यनिन्दा-स्तुतिः** = जो निंदा-स्तुती समान समजणारा,
**मौनी** = मननशील,
**येन** = ज्या
**केनचित्** = कोणत्याही प्रकाराने (शरीरनिर्वाह होणे-न-होणे यात)
**सन्तुष्टः** = संतुष्ट,
**अनिकेतः** = राहण्याचे स्थान तसेच शरीराविषयी ममता, आसक्तिरहित (आणि)
**स्थिरमतिः** = स्थिरबुद्धी असणारा आहे,
**भक्तिमान्** = (तो) भक्तिमान्
**नरः** = मनुष्य
**मे** = मला
**प्रियः** = प्रिय आहे

*व्याख्या*— **समः शत्रौ च मित्रे च**—येथे भगवंतांनी भक्ताचे ठिकाणी व्यक्तीविषयी असणाऱ्या समतेचे वर्णन केले आहे. सर्वत्र भगवद्बुद्धी असल्याने तसेच रागद्वेषरहित असल्यामुळे सिद्ध भक्ताचा कोणाविषयीही शत्रु-मित्रतेचा भाव राहत नाही. लोकच त्याच्या व्यवहारात आपल्या स्वभावानुसार अनुकूलता अथवा प्रतिकूलतेला पाहून, त्याच्यावर मित्रता अथवा शत्रुतेचा आरोप करतात. साधारण लोकांचे तर काय सांगावे, सावधान असणाऱ्या साधकांचाही त्या सिद्ध भक्ताविषयी मित्रतेचा आणि शत्रुतेचा भाव होऊ शकतो. परंतु भक्त स्वतः आपल्या ठिकाणी नेहमी पूर्णतया सम राहत असतो. त्याच्या अंतःकरणात कधीही कोणाविषयी शत्रु-मित्रतेचा भाव उत्पन्न होत नाही.

समजा, भक्ताविषयी शत्रुतेचा आणि मित्रतेचा भाव ठेवणाऱ्या दोन व्यक्तींमध्ये पैशाच्या वाट्याविषयी काही विवाद झाला आणि त्याचा निवाडा करण्यासाठी या भक्ताकडे गेले. तर त्यावेळी भक्त पैशाची वाटणी करण्याचा निर्णय देताना शत्रुभाव ठेवणाऱ्यास थोडे अधिक आणि मित्रभाव ठेवणाऱ्यास थोडे कमी धन देईल. जरी भक्ताच्या या व्यवहारात विषमता दिसून येते, तरीपण शत्रूभाव ठेवणाऱ्या व्यक्तीला या निर्णयात समता दिसेल की, ह्याने पक्षपातरहित वाटणी केली आहे. म्हणून भक्ताच्या या निर्णयात विषमता (पक्षपात) दिसली तरी वास्तविक ही विषमता (समता उत्पन्न करणारी असल्यामुळे) समताच म्हणविली जाईल.

उपर्युक्त पदाने हेही सिद्ध होते की, सिद्ध भक्ताशी ही लोक (आपल्या भावनेनुसार) शत्रुता मित्रतेचा व्यवहार करतात आणि त्या व्यवहाराने आपल्याला त्याचा शत्रु-मित्र मानतात. म्हणूनच त्याला येथे शत्रु-मित्ररहित न म्हणता "शत्रु-मित्रात सम" म्हटले गेले आहे.

**तथा मानापमानयोः**—मान-अपमान परकृत क्रिया आहेत, ज्या शरीराला अनुसरून होत असतात. भक्ताला आपले म्हणविले जाणाऱ्या शरीराविषयी अहंताही नसते व ममताही नसते. म्हणून शरीराचा मान-अपमान झाला तरी, भक्तांच्या अंतःकरणात कोणताही विकार (हर्ष-शोक) उत्पन्न होत नाही. तो नित्य-निरंतर समतेमध्ये स्थित राहत असतो.

**शीतोष्णसुखदुःखेषु समः**—या पदांत दोन ठिकाणी सिद्ध भक्ताची समता दाखविली गेली आहे.

(१) शीत-उष्णात समता अर्थात् इंद्रियांचा आपापल्या विषयाशी संयोग झाला असता, कोणताही विकार उत्पन्न न होणे.

(२) सुख-दुःखात समता अर्थात् धनादी पदार्थांची प्राप्ती अथवा अप्राप्ती झाली असता अंतःकरणात कोणताही विकार उत्पन्न न होणे.

"शीतोष्ण" शब्दाचा अर्थ सर्दी-गरमी असा होतो. सर्दी-गर्मी हे त्वगिन्द्रियांचे विषय आहेत. भक्त केवळ त्वगिन्द्रियांचे विषयातच सम राहत असतो असे नाही. तो तर सर्व इंद्रियांच्या विषयामध्ये सम राहत असतो. म्हणून येथे "शीतोष्ण" शब्द सर्व इंद्रियांच्या विषयांचा वाचक आहे. प्रत्येक इंद्रियाचा आपापल्या विषयाशी संयोग झाल्यावर

भक्ताला त्या (अनुकूल वा प्रतिकूल) विषयाचे ज्ञान तर होते, परंतु त्याच्या अंत:करणात हर्ष-शोकादी विकार निर्माण होत नाहीत. तो नेहमी सम राहत असतो.

सामान्य माणूस धनादी अनुकूल पदार्थांच्या प्राप्तीमध्ये सुख तसेच प्रतिकूल पदार्थांच्या प्राप्तीत दु:खाचा अनुभव करतो. परंतु तेच पदार्थ प्राप्त झाले अथवा न झाले तर, सिद्ध भक्ताच्या अंत:करणात कधी किंचिन्मात्रही राग-द्वेष, हर्ष-शोकादी विकार होत नाहीत. तो प्रत्येक परिस्थितीत सम राहत असतो.

''सुख-दु:खात सम'' राहणे आणि ''सुख-दु:ख रहित'' होणे दोन्हीचा एकाच अर्थाने गीतेत प्रयोग झाला आहे सुख-दु:खाची परिस्थिती अवश्यंभावी आहे. म्हणून त्यापासून रहित होणे असंभव आहे. म्हणून भक्त अनुकूल अथवा प्रतिकूल परिस्थितीत सम राहत असतो. मात्र अनुकूल तसेच प्रतिकूल परिस्थितीला अनुसरून अंत:करणात जे हर्ष-शोक होत असतात, त्यापासून रहित होणे शक्य आहे. या दृष्टीने गीतेत जेथे ''सुख-दु:खात सम'' होण्याची गोष्ट आली आहे, तेथे सुख-दु:खाच्या परिस्थितीत सम समजले पाहिजे आणि जेथे ''सुख-दु:ख रहित'' होण्याची गोष्ट आली आहे तेथे (अनुकूल तसेच प्रतिकूल परिस्थितीच्या प्राप्तीने होणारे) हर्ष-शोक-रहित समजले पाहिजे.

**सङ्गविवर्जित:—**''सङ्ग'' शब्दाचा अर्थ संबंध (संयोग) तसेच आसक्ती दोन्हीही होतात. स्वरूपाने सर्व पदार्थांचा संग अर्थात् संबंध सोडू शकेल, हे मनुष्याला शक्य नाही, कारण जोपर्यंत मनुष्य जिवंत असतो, तोपर्यंत शरीर, मन, बुद्धी, इंद्रिये, त्याच्याबरोबर राहतातच. मात्र शरीराहून वेगळ्या काही पदार्थांचा त्याग स्वरूपाने केला जाऊ शकतो. जसे एखाद्या व्यक्तीने स्वरूपाने प्राणी पदार्थांचा संबंध सोडला, परंतु त्याच्या अंत:करणात जर त्यांच्याविषयी किंचिन्मात्रही आसक्ती कायम असेल, तर तो त्या प्राणी-पदार्थांपासून दूर असूनही, वास्तविक त्याचा त्यांच्याशी संबंध कायम आहेच. या उलट जर अंत:करणात प्राणी-पदार्थांची किंचित्मात्रही आसक्ती नसेल तर, ते जवळ असूनही त्यांचा संबंध वास्तविक नाही. जर पदार्थांचा स्वरूपाने त्याग करून मुक्ती झाली असती तर, मरणारी प्रत्येक व्यक्ती मुक्त झाली असती, कारण त्याने तर आपल्या शरीराचाही त्याग केलेला असतो. परंतु अशी गोष्ट नाही. अंत:करणात आसक्ती असताना शरीराचा त्याग झाला तरीही, संसाराचे बंधन कायम राहते. म्हणून मनुष्याला सांसारिक आसक्तीच बांधणारी असते, सांसारिक प्राणी-पदार्थांचा स्वरूपाने संबंध नव्हे!

आसक्ती समाप्त करण्यासाठी पदार्थांचा स्वरूपाने त्याग करणेही एक साधन होऊ शकते, परंतु खास आवश्यकता आसक्तीचा संपूर्णपणे त्याग करण्याचीच आहे. संसाराविषयी जर थोडीही आसक्ती असेल, तर त्याचे चिंतन अवश्य होईल. याच कारणाने ती आसक्ती साधकाला क्रमाने कामना, क्रोध, मूढता, इत्यादीच्या अधीन करून त्याला पतनाच्या खड्डयात पाडण्याला कारणीभूत होऊ शकते (२। ६२-६३)

भगवंतांनी दुसऱ्या अध्यायाच्या एकोणसाठाव्या श्लोकात ''**परं दृष्ट्वा निवर्तते**'' पदांनी भगवत्प्राप्ती नंतर आसक्तीच्या संपूर्णपणे निवृत्तीविषयी म्हटले आहे. भगवत्प्राप्तीपूर्वीही आसक्तीची निवृत्ती होऊ शकते, परंतु भगवत्प्राप्तीनंतर तर आसक्ती समूळ निवृत्त होतेच. भगवत्प्राप्त महापुरुषाच्या ठिकाणी आसक्तीचा सर्वथा अभाव असतोच. परंतु भगवत्प्राप्ती- पूर्वी साधनावस्थेत आसक्तीचा सर्वथा अभाव नसतोच असा काही नियम नाही. साधनावस्थेतही आसक्तीचा सर्वथा अभाव होऊन, साधकाला तात्काळ भगवत्प्राप्ती होऊ शकते (५। २१, १६। २२)

आसक्ती तर परमात्म्याचा अंश शुद्ध चेतनात राहत नसते आणि जडात (प्रकृती) ही नसते. ती जड आणि चेतनाच्या संबंधरूपी ''मी'' पणाच्या मान्यतेत राहत असते. तीच आसक्ती बुद्धी, मन, इंद्रिये आणि विषयात (पदार्थ) प्रतीत होत असते. जर साधकाच्या ''मी'' पणाच्या मान्यतेत राहणारी आसक्ती समाप्त झाली, तर दुसऱ्या ठिकाणी प्रतीत होणारी आसक्ती आपोआप समाप्त होईल. आसक्तीचे कारण अविवेक आहे. आपल्या विवेकाला पूर्णपणे महत्त्व न दिल्यामुळे साधकात आसक्ती राहत असते. भक्तात अविवेक राहत नाही म्हणून तो आसक्तीपासून सर्वथारहित असतो.

आपल्या अंशी भगवंतापासून विमुख होऊन भ्रमाने संसाराला आपले समजल्याने, संसाराविषयी आसक्ती निर्माण होते आणि आसक्ती झाल्याने संसाराचा संबंध दृढ होतो. संसाराशी मानलेला आपलेपणा सर्वथा समाप्त झाल्यास बुद्धी सम होते. बुद्धी सम झाली असता स्व आसक्तिरहित होतो.

## मार्मिक गोष्ट

वास्तविक जीवमात्राची भगवंताशी स्वाभाविक अनुरक्ती (प्रेम) असते. जोपर्यंत संसाराशी भ्रमाने मानलेला आपलेपणाचा संबंध आहे, तोपर्यंत ती अनुरक्ती प्रकट होत नाही, तर संसाराच्या आसक्तीरूपाने प्रतीत होत असते. संसाराची आसक्ती राहत असतानासुद्धा वास्तविक भगवंताविषयीची

अनुरक्ती नष्ट होत नाही. अनुरक्ती प्रगट होताच आसक्ती (सूर्योदयानंतर अंधकाराप्रमाणे) संपूर्णपणे समाप्त होते. जस-जशी संसारापासून विरक्ती होत जाते, तस-तशी भगवंताविषयी अनुरक्ती प्रगट होत जाते. हा नियम आहे की, आसक्तीला समाप्त करून विरक्ती स्वतःही, अग्नी जसा लाकूड जाळून शांत होतो, तशी शांत होते. अशा प्रकारे आसक्ती आणि विरक्ती न राहिल्यास सहज-स्वाभाविक अनुरक्तीचा (भगवत्प्रेम) स्रोत प्रवाहित होऊ लागतो. या-साठी थोडाही कोणता प्रयत्न करावा लागत नाही. मग भक्त सर्व प्रकारे भगवंतांना समर्पित होतो. त्याच्या संपूर्ण क्रिया भगवंताच्या प्रियतेसाठीच होत असतात. त्यामुळे भगवान् प्रसन्न होऊन त्या भक्ताला आपले प्रेम प्रदान करतात. भक्त त्या प्रेमालाही भगवंतातच लावतो. यामुळे भगवान् फार आनंदित होतात व पुन्हा त्याला प्रेम प्रदान करतात. भक्त पुन्हा त्या प्रेमाला भगवंतातच लावतो. अशा प्रकारे भक्त आणि भगवान् यांच्यामध्ये प्रतिक्षण वर्धमान प्रेमाच्या देवाण घेवाणीची ही लीला चालू राहते.

**तुल्यनिन्दास्तुतिः**—निंदा-स्तुती प्रामुख्याने नावाची होत असते. हीसुद्धा परकृत क्रिया आहे. लोक आपल्या स्वभावानुसार भक्ताची निंदा अथवा स्तुती करत असतात. भक्ताचे ठिकाणी आपले म्हणविले जाणारे नाव आणि शरीरा-विषयी लेशमात्रही अहंता आणि ममता नसते. म्हणून निंदा-स्तुतीचा त्याचेवर लेशमात्रही परिणाम होत नाही. भक्ताला आपली स्तुती अथवा प्रशंसा करणाऱ्याविषयी आसक्तीही नसते आणि निंदा करणाऱ्याविषयी द्वेषही नसतो, त्याची दोघांविषयीही समबुद्धी असते.

सामान्य मनुष्यांच्या अंतःकरणात आपल्या प्रशंसे-विषयी कामना असते. म्हणून ते आपली निंदा ऐकून दुःखाचा आणि स्तुती ऐकून सुखाचा अनुभव करत असतात. या उलट (आपली प्रशंसा न इच्छिणारे) साधक पुरुष निंदा ऐकून सावध होतात आणि स्तुती ऐकून लज्जित होतात. परंतु नावाशी थोडाही आपलेपणा नसल्याकारणाने, सिद्ध भक्त या दोन्ही भावांनी रहित असतो अर्थात् निंदा-स्तुतीत सम असतो. मात्र तोही कधी कधी लोकसंग्रहासाठी साधका-प्रमाणे (निंदेत सावध तसेच स्तुतीत लज्जित होण्याचा) व्यवहार करू शकतो.

भक्ताची सर्वत्र भगवद्बुद्धी असल्याकारणानेही त्याचा निंदा-स्तुती करणाराविषयी भेदभाव राहत नाही. असा भेदभाव न राहिल्यानेच, तो निंदास्तुतीत सम आहे असे प्रतीत होते.

भक्ताकडून तर अशुभ कर्म होऊच शकत नाहीत आणि शुभ कर्माच्या होण्यात तो केवळ भगवंताला हेतू मानत असतो. असे असूनही त्याची कोणी निंदा-स्तुती केली, तरीही त्याच्या चित्तात कोणताही विकार उत्पन्न होत नाही.

**मौनी**—सिद्ध भक्ताकडून सहज-स्वाभाविक भगवत्स्व-रूपाचे मनन होत राहते. म्हणून त्याला "**मौनी**" अर्थात् मननशील म्हटले गेले आहे. अंतःकरणात उत्पन्न होणाऱ्या प्रत्येक वृत्तीमध्ये त्याला "**वासुदेवः सर्वम्**" (गीता ७। १९) "सर्व काही भगवंतच आहेत" हेच दिसत असते. म्हणून त्याच्याकडून निरन्तरच भगवंताचे मनन होत राहते.

येथे "**मौनी**" पदाचा अर्थ "वाणीचे मौन ठेवणारा" मानला जाऊ शकत नाही. कारण असे मानल्याने वाणीद्वारा भक्तीचा प्रचार करणारे भक्त, भक्तच म्हणविले जाणार नाहीत. याशिवाय जर वाणीचे मौन ठेवल्यानेच भक्त होणे शक्य असते, तर भक्त होणे फारच सोपे झाले असते आणि असे भक्त असंख्य झाले असते. परंतु संसारात भक्तांची संख्या अधिक दिसत नाही. याशिवाय आसुरी स्वभावाचा दंभी व्यक्तीही हट्टाने वाणीचे मौन ठेवू शकतो. परंतु येथे भगवत्प्राप्त सिद्ध भक्तांचे लक्षण वर्णन केले जात आहे. म्हणून येथे "**मौनी**" पदाचा अर्थ "भगवत्स्वरूपाचे मनन करणारा" असेच मानणे युक्तिसंगत आहे.

**सन्तुष्टो येन केनचित्**—भक्त, इतर लोकांना, "**सन्तुष्टो येन केनचित्**" अर्थात् प्रारब्धानुसार शरीरनिर्वाहासाठी जे काही मिळेल, त्यात संतुष्ट दिसतो, परंतु वास्तविक भक्ताच्या संतुष्टतेचे कारण कोणते सांसारिक पदार्थ, परिस्थिती इत्यादी नसते. एकमात्र भगवंताविषयीच प्रेम असल्यामुळे तो नित्य निरंतर भगवंतातच संतुष्ट राहत असतो. या संतुष्टतेमुळे तो संसाराच्या प्रत्येक अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीत सम राहत असतो कारण प्रत्येक अनुकूल वा प्रतिकूल परिस्थिती, भगवंताचे मंगलमय विधानच असते, असा त्याचा अनुभव असतो. अशा प्रकारे प्रत्येक परिस्थितीत नित्य-निरंतर संतुष्ट राहत असल्याने त्याला "**सन्तुष्टो येन केनचित्**" म्हटले गेले आहे.

**अनिकेतः**—ज्याचे कोणतेच निवास स्थान नसते तेच "अनिकेत" असतात, असे नाही. मग तो गृहस्थी असो अथवा साधु-संन्यासी, ज्यांची आपल्या राहणाच्या स्थानाविषयी ममता, आसक्ति नसते, ते सर्व "अनिकेत" आहेत. भक्ताची राहण्याच्या स्थानाविषयी आणि शरीराविषयी (स्थूल, सूक्ष्म आणि कारण शरीर) लेशमात्रही आपलेपणा आणि आसक्ती नसते. म्हणून

त्यांना "**अनिकेतः**" म्हटले गेले आहे.

**स्थिरमतिः**—भक्ताच्या बुद्धीत भगवत्तत्त्वाची सत्ता आणि स्वरूपाविषयी कोणताच संशय अथवा विपर्यय (विपरीत ज्ञान) नसतो. म्हणून त्याची बुद्धी भगवत्तत्त्वाच्या ज्ञानापासून कधी कोणत्याही अवस्थेत विचलित होत नाही. म्हणून त्याला "**स्थिरमतिः**" म्हटले गेले आहे. भगवत्तत्त्वाला जाणून घेण्यासाठी त्याला कधी कोणते प्रमाण अथवा शास्त्र-विचार, स्वाध्याय इत्यादीची आवश्यकता नसते, कारण तो स्वाभाविकपणे भगवत्तत्त्वात तल्लीन राहतो.

स्थिरबुद्धी होण्यात कामनाच बाधक असतात (२।४४) म्हणून कामनांच्या त्यागानेच स्थिरबुद्धी होणे शक्य आहे (२।५५). अंतःकरणात सांसारिक (संयोगजन्य) सुखाची कामना असल्याने संसाराविषयी आसक्ती उत्पन्न होते. ही आसक्ती संसाराला असत्य अथवा मिथ्या जाणून घेतल्यावरही समाप्त होत नाही. जसे सिनेमात दिसणारे दृश्य (प्राणी-पदार्थ) मिथ्या जाणत असूनही, त्याविषयी आसक्ती उत्पन्न होते. अथवा ज्याप्रमाणे भूतकाळाच्या घटनांचे स्मरण करताना, मानसिक दृष्टीसमोर येणारी दृश्य मिथ्या आहेत, असे जाणत असतांनाही, त्यांच्याविषयी आसक्ती निर्माण होते. म्हणून जोपर्यंत अंतःकरणात सुखाची कामना आहे, तोपर्यंत संसाराला मिथ्या मानले तरीही संसाराची आसक्ती समाप्त होत नाही. आसक्तीने संसाराची स्वतंत्र सत्ता दृढ होते. सांसारिक सुखाची कामना समाप्त झाल्यावर आसक्ती आपोआप समाप्त होते. आसक्ती समाप्त झाली असता, संसाराच्या स्वतंत्र सत्तेचा अभाव होत असतो आणि एका भगवत्तत्त्वात बुद्धी स्थिर होत असते.

**भक्तिमान्मे प्रियो नरः**—"**भक्तिमान्**" पदात "भक्ति" शब्दाबरोबर नित्ययोगाच्या अर्थात् "**मतुप्**" प्रत्यय आहे. याचे तात्पर्य, मनुष्याचे ठिकाणी स्वाभाविकरूपाने "भक्ती" (भगवत्प्रेम) राहत असते. मनुष्याकडून ही चूक होते की, तो भगवंताला वगळून संसाराची भक्ती करू लागतो. म्हणून त्याला स्वाभाविक असणाऱ्या भगवद्भक्तीचा रस मिळत नाही आणि त्यामुळे त्याच्या जीवनात नीरसता येत असते. सिद्ध भक्त नित्य-निरंतर भक्तिरसात तल्लीन राहतो म्हणून त्याला "**भक्तिमान्**" म्हटले गेले आहे. असा भक्तिमान् मनुष्य भगवंताला प्रिय असतो.

**नरः**—हे पद देण्याचे तात्पर्य, ज्याने भगवंताला प्राप्त करून घेऊन आपले मनुष्यजीवन सफल (सार्थक) करून घेतले आहे, तोच वास्तविक नर (मनुष्य) म्हणविला जाणे योग्य आहे. जो मनुष्यशरीराला प्राप्त करून सांसारिक भोग आणि संग्रहातच मग्न आहे, तो नर (मनुष्य) म्हणवून घेण्यास पात्र नाही.

[या दोन श्लोकात भक्ताचे सदा-सर्वदा समभावामध्ये स्थित राहण्याबद्दल सांगितले गेले आहे. शत्रु-मित्र, मान-अपमान, शीत-उष्ण, सुख-दुःख, आणि निंदा-स्तुती या पांचही द्वन्द्वांमध्ये समता झाल्यानेच साधक पूर्णपणे समभावात स्थित आहे, असे म्हटले जाऊ शकते.]

## प्रकरणसंबंधी विशेष गोष्ट

भगवंतानी पहिल्या प्रकरणाच्या अंतर्गत तेराव्या चौदाव्या श्लोकांत सिद्ध भक्तांच्या लक्षणांचे वर्णन करून शेवटी "**यो मद्भक्तः स मे प्रियः**" म्हटले, दुसऱ्या प्रकरणाच्या अंतर्गत पंधराव्या श्लोकाच्या शेवटी "**यः स च मे प्रियः**" म्हटले, तीसऱ्या प्रकरणाच्या अंतर्गत सोळाव्या श्लोकाच्या शेवटी "**यो मद्भक्तः स मे प्रियः**" म्हटले, चौथ्या प्रकरणाच्या अंतर्गत सतराव्या श्लोकाच्या शेवटी "**भक्तिमान्यः स मे प्रियः**" म्हटले आणि शेवटच्या पाचव्या प्रकरणाच्या अंतर्गत अठराव्या एकोणीसाव्या श्लोकाच्या शेवटी "**भक्तिमान्मे प्रियो नरः**" म्हटले. अशा प्रकारे भगवंतानी पाच वेळा वेगवेगळी "**मे प्रियः**" पदे देऊन सिद्ध भक्तांच्या लक्षणाला पाच भागांत विभक्त केले आहे. म्हणून सात श्लोकांत सांगितल्या गेलेल्या सिद्ध भक्तांच्या लक्षणांना एकाच प्रकरणांतर्गत आहेत असे समजू नये. याचे मुख्य कारण, जर हे एकाच प्रकरणात असते तर एका लक्षणाला पुन्हा पुन्हा न सांगता एकदाच सांगितले असते, आणि "**मे प्रियः**" पदही एकदाच सांगितले असते.

पाचही प्रकरणाच्या अंतर्गत सिद्ध भक्तांच्या लक्षणांत राग-द्वेष आणि हर्ष-शोकाचा अभाव सांगितला गेला आहे. जसे पहिल्या प्रकरणात "**निर्ममः**" पदाने आसक्तीचा, "**अद्वेष्टा**" पदाने द्वेषाचा आणि "**समदुःखसुखः**" पदाने हर्ष-शोकाचा अभाव सांगितला गेला आहे. दुसऱ्या प्रकरणात "**हर्षामर्षभयोद्वेगैः**" पदाने राग-द्वेष आणि हर्ष-शोकाचा अभाव सांगितला गेला आहे. तीसऱ्या प्रकरणात "**अनपेक्ष**" पदाने आसक्तीचा, "**उदासीनः**" पदाने द्वेषाचा आणि "**गतव्यथः**" पदाने हर्ष-शोकाचा अभाव सांगितला गेला आहे. चौथ्या प्रकरणात "**न काङ्क्षति**" पदाने आसक्तीचा, "**न द्वेष्टि**" पदाने द्वेषाचा आणि "**न हृष्यति**" तसेच "**न शोचति**" पदांनी हर्ष-शोकाचा अभाव सांगितला गेला आहे. शेवटच्या पाचव्या प्रकरणात "**सङ्गविवर्जितः**" पदाने आसक्तीचा, "**संतुष्टः**" पदाने, एकमात्र भगवंतामध्येच संतुष्ट असल्याकारणाने द्वेषाचा आणि "**शीतोष्णसुखदुःखेषु समः**"

पदांनी हर्ष-शोकाचा अभाव सांगितला गेला आहे.

जर सिद्ध भक्तांची लक्षणे दर्शविणारे (सात श्लोकांचे) एकच प्रकरण असते, तर सिद्ध भक्तात राग-द्वेष, हर्ष-शोकादी विकारांचा अभाव कुठे शब्दांनी तर कुठे भावांनी वारंवार सांगण्याची गरज नव्हती. त्याचप्रमाणे चौदाव्या आणि एकोणीसाव्या श्लोकांत **''संतुष्टः''** पदाचा तसेच तेराव्या श्लोकात **''समदुःखसुखः''** आणि अठराव्या श्लोकात **''शीतोष्णसुखदुःखेषु समः''** पदांचाही सिद्ध भक्तांच्या लक्षणात दोन वेळा प्रयोग झाला आहे. यावरुन (सिद्ध भक्तांच्या लक्षणांचे एकच प्रकरण मानल्याने) पुनरुक्तीचा दोष येतो. भगवंताच्या वचनात पुनरुक्तीचा दोष येणे शक्यच नाही. म्हणून सातही श्लोकांच्या विषयाला एक प्रकरण न मानता वेगवेगळी पाच प्रकरणे मानणेच युक्तिसंगत आहे.

अशा प्रकारे पाचही प्रकरणे स्वतंत्र (भिन्न-भिन्न) असल्याने कोणत्याही एका प्रकरणाचीही सर्व लक्षणे ज्या भक्ताच्या ठिकाणी असतील, तोच भगवंताचा प्रिय भक्त आहे. प्रत्येक प्रकरणात सिद्ध भक्तांची वेगवेगळी लक्षणे दाखविण्याचे कारण हे आहे की, साधनपद्धती, प्रारब्ध, वर्ण, आश्रम, देश, काल, परिस्थिती, इत्यादीच्या भेदाने सर्व भक्तांच्या प्रकृती (स्वभाव) मध्ये परस्पर थोडा-फार फरक राहत असतो. मात्र, राग-द्वेष, हर्ष-शोकादी विकारांचा अत्यंत अभाव तसेच समतेत स्थिती आणि संपूर्ण प्राण्यांच्या हिताविषयी तळमळ सर्वांची समानच असते.

साधकाला आपल्या रुची, विश्वास, योग्यता, स्वभाव, इत्यादीनुसार जे प्रकरण आपल्या अनुकूल दिसेल, त्यालाच आदर्श मानून त्यानुसार त्याने आपले जीवन घडविण्याच्या कामी लागावे. कोण्याही एका प्रकरणाचीही जर पूर्ण लक्षणे आपल्यात उतरली नाहीत, तरीही साधकाने निराश होता कामा नये. मग सफलता अवश्यंभावी आहे.

**परिशिष्ट आहे**—या दोन श्लोकात भगवंताने तीच स्थाने दिली आहेत जेथे समता होणे कठीण असते. जर यात समता प्राप्त झाली तर दुसऱ्या ठिकाणी समता होण्यात काठिण्य राहणार नाही. आपल्यावर कोणताही परिणाम न होणे 'समता' आहे.

जरी भक्ताच्या दृष्टीने भगवंताशिवाय दुसरी सत्ता नाहीच, तरी दुसऱ्या लोकांच्या दृष्टीत तो शत्रू आणि मित्र यात सम दिसतो. शत्रुत्व-मित्रत्व याचे ज्ञान होऊनही तो सम राहतो.

**'शीतोष्णसुखदुःखेषु'**—भक्त शरीराची अनुकूलता-प्रतिकूलता यातही सम राहतो आणि मन-बुद्धीची अनुकूलता-प्रतिकूलता यातही सम राहतो. तात्पर्य, भक्त शरीराची अनुकूलता-प्रतिकूलता, इंद्रियांची अनुकूलता-प्रतिकूलता, मनाची अनुकूलता-प्रतिकूलता, बुद्धीची अनुकूलता-प्रतिकूलता, सिद्धान्ताची अनुकूलता-प्रतिकूलता इत्यादी सर्व प्रकारच्या अनुकूलता-प्रतिकूलता यात सम राहतो. त्याचा अनुकूलतेतही राग (आसक्ती) राहत नाही आणि प्रतिकूलतेतही द्वेष राहत नाही.

**'यो मद्भक्तः स मे प्रियः'**, **'भक्तिमान्मे प्रियो नरः'** इत्यादी पदांचे तात्पर्य हे आहे की, ते भक्तीमुळे भगवंताला प्रिय आहेत, गुणांमुळे (लक्षणांमुळे) नव्हे. गुण मुख्य नाहीत तर भक्ती मुख्य आहे.

***संबंध***—*मागील सात श्लोकांत भगवंतांनी सिद्ध भक्तांची एकूण एकोणचाळीस लक्षणे सांगितली. आता पुढील श्लोकात भगवान् अर्जुनाच्या प्रश्नाचे स्पष्ट रीतीने उत्तर देत आहेत.*

## ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते।
## श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः॥२०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = परंतु | **इदम्** | = या | | सेवन करीतात, |
| **ये** | = जे (माझ्यात) | **धर्म्यामृतम्** | = धर्ममय अमृताचे | **ते** | = ते |
| **श्रद्दधानाः** | = श्रद्धा ठेवणारे (आणि) | **यथा, उक्तम्** | = जसे सांगितले आहे (तसेच) | **मे** | = मला |
| **मत्परमाः** | = मत्परायण असलेले | | | **अतीव** | = अत्यंत |
| **भक्ताः** | = भक्त | **पर्युपासते** | = उत्तम प्रकारे | **प्रियाः** | = प्रिय आहेत. |

*व्याख्या*—**ये तु**—येथे **''ये''** पदाने भगवंतांनी त्या साधकांचा संकेत केला आहे, ज्यांच्या विषयात अर्जुनाने पहिल्या श्लोकात प्रश्न करीत असताना **''ये''** पदाचा प्रयोग केला होता. त्याच प्रश्नाच्या उत्तरात भगवंतांनी दुसऱ्या श्लोकात सगुणाची उपासना करणाऱ्या साधकांना आपल्या मतामध्ये (**''ये''** आणि **''ते''** पदानी) **''युक्ततमाः''** सांगितले होते. मग त्या सगुण उपासनेचे साधन सांगितले आणि त्यानंतर सिद्ध भक्तांची लक्षणे सांगून आता त्याच प्रसंगाचा उपसंहार करतात.

येथे **''ये''** पद त्या परम श्रद्धाळू भगवत्परायण

साधकांसाठी आले आहे, जे सिद्ध भक्तांच्या लक्षणांना आदर्श मानून साधना करतात.

"**तु**" पदाचा प्रयोग प्रकरणाला वेगळे करण्यासाठी केला जातो. येथे सिद्ध भक्तांच्या प्रकरणाहून साधक भक्तांचे प्रकरण वेगळे करण्यासाठी "**तु**" पदाचा प्रयोग झाला आहे. या पदाने असे प्रतीत होते की, सिद्ध भक्तापेक्षा साधक भक्त भगवंताला विशेष प्रिय आहेत.

**श्रद्दधानाः**—भगवत्प्राप्ती झाली असल्यामुळे सिद्ध भक्तांच्या लक्षणात श्रद्धेची गोष्ट आली नाही, कारण जोपर्यंत नित्यप्राप्त भगवंताचा अनुभव येत नाही, तोपर्यंत श्रद्धेची आवश्यकता आहे. म्हणून या पदाला श्रद्धाळू साधक भक्तांचेच वाचक समजले पाहिजे. असे श्रद्धाळू भक्त भगवंताच्या धर्ममय अमृतरूपी उपदेशाला (जे भगवंतानी तेराव्यापासून एकोणीसाव्या श्लोकापर्यंत सांगितले आहे) भगवत्प्राप्तीच्या उद्देशाने आपल्यात उतरविण्याचा प्रयत्न करतात.

जरी भक्तीच्या साधनेत श्रद्धा आणि प्रेमाचे, तसेच ज्ञानाच्या साधनेत विवेकाचे महत्त्व असते, तरीपण यावरुन असे समजू नये की, भक्तीच्या साधनेत विवेकाचे आणि ज्ञानाच्या साधनेत श्रद्धेचे महत्त्वच नसते. वास्तविक श्रद्धा आणि विवेकाची सर्व साधनेत फार मोठी आवश्यकता असते. विवेक असल्याने भक्ती साधनेत वेग येतो. त्याचप्रमाणे शास्त्राविषयी तसेच परमात्मतत्त्वाविषयी श्रद्धा असल्यानेच ज्ञान साधनेचे पालन होऊ शकते. म्हणून भक्ती आणि ज्ञान दोन्हीही साधनेत श्रद्धा आणि विवेक सहायक आहेत.

**मत्परमाः**—साधक भक्तांचा सिद्ध भक्तांविषयी अत्यंत पूज्य भाव असतो. त्यांची सिद्ध भक्तांच्या गुणांविषयी श्रेष्ठ बुद्धी असते. म्हणून ते त्या गुणांना आदर्श मानून आदरपूर्वक त्यांचे अनुसरण करण्यासाठी भगवत्परायण होतात. अशा प्रकारे भगवंताचे चिंतन करण्याने आणि भगवंतावरच अवलंबून राहिल्याने ते सर्व गुण त्यांचे ठिकाणी आपोआप येतात.

भगवंतांनी अकराव्या अध्यायाच्या पंचावन्नाव्या श्लोकात "**मत्परमः**" पदाने आणि याच अध्यायाच्या (बाराव्या) सहाव्या श्लोकात "**मत्पराः**" पदाने आपल्या परायण होण्याविषयी विशेषरूपाने सांगून शेवटी पुन्हा त्याच विषयाला या श्लोकात "**मत्परमाः**" पदाने म्हटले आहे. यावरुन सिद्ध होते की, भक्तियोगात भगवत्परायणता मुख्य आहे. भगवत्परायण झाल्यावर भगवत्कृपेने आपोआप साधन होत असते आणि असाधनाचा (साधनेचे विघ्न) नाश होत असतो.

**धर्म्यामृतमिदं यथोक्तम्**—सिद्ध भक्तांत एकोणचाळीस लक्षणांची पाच प्रकरणे धर्ममय अर्थात् धर्माने ओतप्रोत अशी आहेत. त्यामध्ये अधर्माचा अंश लेशमात्रही नाही. ज्या साधनेत साधन-विरोधी अंश सर्वथा नसतो, ते साधन अमृततुल्य असते. पूर्वी सांगितलेला लक्षण-समुदाय धर्ममय असल्याने, तसेच त्यांच्यात साधन-विरोधी कोणती गोष्ट नसल्यानेच, त्याला धर्म्यामृत संज्ञा दिली गेली आहे.

जेव्हा साधकाचा उद्देश किंचिन्मात्रही धन, मान, सन्मान, आदर, सत्कार, संग्रह, सुखभोग, इत्यादीचा नसून एकमात्र भगवत्प्राप्तीच असेल तेव्हाच साधनेत साधन-विरोधी कोणताच अंश नसून सुद्धा, जसे पूर्वी सांगितले गेले आहे, ठीक तसेच्या तसे धर्ममय अमृताचे सेवन करणे, शक्य आहे.

प्रत्येक प्रकरणाची सर्व लक्षणे धर्म्यामृत आहेत. म्हणून साधक ज्या प्रकरणाच्या लक्षणांना आदर्श मानून साधन करत असतो, त्याच्यासाठी तेच धर्म्यामृत आहे.

धर्म्यामृताची जी "**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः ----**" इत्यादी लक्षणे सांगितली गेली आहेत, ती आंशिकरूपाने सर्व साधकात राहत असतात आणि त्यांच्याबरोबर काही दुर्गुण-दुराचारही राहत असतात. प्रत्येक प्राण्यात गुण आणि अवगुण दोन्हीही राहत असतात, तरीपण अवगुणांचा तर संपूर्णपणे त्याग होऊ शकतो परंतु गुणांचा सर्वथा त्याग होऊ शकत नाही, कारण साधन आणि स्वभावानुसार सिद्ध पुरुषात गुणांचे तारतम्य तर राहत असते परंतु त्यांच्यात गुणांचा उणीवरूपी अवगुण थोडाही राहत नाही. गुणामध्ये न्यूनाधिक्य असल्यामुळे त्यांचे पाच विभाग केले गेले आहेत, परंतु अवगुण सर्वथा त्याज्य आहे, म्हणून त्यांचा विभाग होऊच शकत नाही.

साधक सत्संग तर करत असतो परंतु त्याबरोबर कुसंग होत राहतो. तो संयम तर करत असतो परंतु त्याबरोबर असंयमही होत राहतो. तो साधन तर करत असतो परंतु त्याबरोबर असाधनही होत राहते. जोपर्यंत साधनेबरोबर असाधन अथवा गुणांबरोबर अवगुण राहत असतात, तोपर्यंत साधकाची साधना पूर्ण होत नाही. कारण असाधनेबरोबर साधन अथवा अवगुणांबरोबर गुण, जे साधक नाहीत, त्यांच्यातही दिसून येतात. याशिवाय जोपर्यंत साधनेबरोबर असाधन अथवा गुणांबरोबर अवगुण राहतात, तोपर्यंत साधकात आपल्या साधक अथवा गुणांचा अभिमान राहत असतो, जो आसुरी संपत्तीचा

आधार असतो. म्हणून धर्म्यामृताचे यथोक्त सेवन करण्यासाठी म्हटले गेले आहे. तात्पर्य हे आहे की, उपरोक्त वर्णनानुसार त्याचे पालन झाले पाहिजे. जर धर्म्यामृत सेवनाबरोबर दोष (असाधन) राहतील तर भगवत्प्राप्ती होणार नाही. म्हणून या विषयात साधकाने विशेष सावध राहिले पाहिजे. जर साधनेत एखाद्या कारणाने आंशिकरूपाने एखादी दोष वृत्ती उत्पन्न झालीच, तर त्याची अवहेलना न करता तत्परतेने त्याला हटविण्याचा प्रयन केला पाहिजे. प्रयत्न करूनही तो हटला नाही तर, व्याकूळतेने प्रभूला प्रार्थना केली पाहिजे.

जितके सद्गुण, सदाचार, सद्भाव इत्यादी आहेत, ते सर्वचे सर्व ''सत्'' शी (परमात्मा) संबंधीत असतात. त्याचप्रमाणे दुर्गुण-दुराचार, दुर्भाव इत्यादी सर्व ''असत्'' शी संबंधीत असतात. दुराचाराती दुराचारी पुरुषातही सद्गुण-सदाचाराचा अभाव नसतो. कारण ''सत्'' चा (परमात्मा) अंश असल्याने, जीवमात्राचा ''सत्'' शी नित्यसिद्ध संबंध आहे. परमात्म्याशी संबंध असल्याकारणाने कोण्या ना कोण्या अंशात त्याच्यात सद्गुण सदाचार राहणारच. परमात्म्याची प्राप्ती झाल्यावर असत्शी सर्वथा संबंध-विच्छेद होतो आणि दुर्गुण-दुराचार, दुर्भाव इत्यादी सर्वथा नष्ट होतात.

सद्गुण, सदाचार, सद्भाव भगवंताची संपत्ती आहे. म्हणून साधक जितका भगवत सम्मुख अथवा भगवत्परायण होत जाईल, तितक्याच अंशात आपोआप सद्गुण, सदाचार, सद्भाव प्रगट होत जातील आणि दुर्गुण, दुराचार, दुर्भाव, नष्ट होत जातील.

राग-द्वेष, हर्ष-शोक, काम-क्रोध, इत्यादी अंत:करणाचे विकार आहेत, धर्म नव्हे (१३। ६) धर्मीबरोबर धर्माचा नित्यसंबंध राहत असतो. जसे सूर्यरूपी धर्मीबरोबर उष्णतारूपी धर्माचा नित्य संबंध राहत असतो, जो कधी नष्ट होत नाही. म्हणून धर्माशिवाय धर्मी राहू शकत नाही. काम-क्रोधादी विकार सामान्य मनुष्यातही नित्य राहत नाहीत, साधन करणाऱ्यात कमी असतात आणि सिद्ध पुरुषात तर ते मुळीच नसतात. जर हे विकार अंत:करणाचे धर्म असते तर ते नेहमी एकरूपाने राहिले असते आणि अंत:करण (धर्मी) असे पर्यंत कधी नष्ट झाले नसते. म्हणून हे अंत:करणाचे धर्म नव्हेत, तर आगंतुक (येणारे-जाणारे) विकार आहेत. साधक जस-जसा आपल्या एकमात्र लक्ष्य असलेल्या भगवंताकडे वाटचाल करतो, तस-तसे राग-द्वेषादी विकार नष्ट होत जातात आणि भगवत्प्राप्ती झाल्यावर त्या विकारांचा अत्यंत-अभाव होतो.

गीतेत ठिक-ठिकाणी भगवंतांनी ''**तयोर्न वशमागच्छेत्**'' (३।३४), ''**रागद्वेषवियुक्तैः**'' (२।६४), ''**रागद्वेषौ व्युदस्य**'' (१८। ५१) इत्यादी पदांनी साधकांना या राग-द्वेषादी विकारांचा संपूर्णपणे त्याग करण्यासाठी म्हटले आहे. जर हे (राग-द्वेषादी) अंत:कारणाचे धर्म असते तर, अंत:करण असताना यांचा त्याग अशक्य झाला असता आणि अशक्याला शक्य करण्याची आज्ञाही भगवंत कसे देऊ शकले असते?

गीतेत सिद्ध महापुरुषांना संपूर्णपणे राग-द्वेषादी विकार-रहित सांगितले गेले आहे. जसे याच अध्यायाच्या तेराव्या श्लोकापासून ते एकोणीसाव्या श्लोकापर्यंत ठिक-ठिकाणी भगवंतांनी सिद्ध भक्तांना राग-द्वेष विकारापासून सर्वथा मुक्त सांगितले आहे. म्हणूनही हे विकारच सिद्ध होतात, अंत:-करणाचे धर्म नव्हेत. असत्शी सर्वथा विमुख होण्याने त्या सिद्ध महापुरुषात हे विकार लेशमात्रही राहत नाहीत. जर अंत:करणात हे विकार कायम राहिले असते, तर मग ते मुक्त कशापासून झाले असते?

ज्यांच्यात हे विकार लेशमात्रही नसतात, अशा सिद्ध महापुरुषाच्या अंत:करणाच्या लक्षणांना आदर्श मानून भगवत्प्राप्तीसाठी त्यांचे अनुसरण करण्यासाठी भगवंतांनी त्या लक्षणांना येथे ''**धर्म्यामृतम्**'' या नावाने संबोधित केले आहे.

**पर्युपासते**—साधक भक्ताच्या दृष्टीत भगवंताचे आवडते सिद्ध भक्त अत्यंत श्रद्धास्पद असतात. भगवंता-कडे स्वाभाविक आकर्षण (प्रियता) असल्याने त्यांच्यात दैवी संपत्ती अर्थात् सद्गुण (भगवंताचे असल्यामुळे) स्वाभाविकच प्रगट होतात. तरी देखील साधकांचा त्या सिद्ध महापुरुषांच्या गुणांविषयी स्वाभाविक आदर भाव राहतो आणि ते त्या गुणांना आपल्यात उतरविण्याचा प्रयत्न करतात. हेच साधक भक्तांकडून त्या गुणांचे उत्तम रीतीने सेवन करणे, आत्मसात करणे आहे.

याच अध्यायाच्या तेराव्यापासून एकोणीसाव्या श्लोका-पर्यंत, सात श्लोकांत ''धर्म्यामृता'' चे ज्या रूपात वर्णन केले गेले आहे, अगदी त्याच रूपात त्याचे श्रद्धापूर्वक उत्तम प्रकारे सेवन करण्याच्या दृष्टिने येथे ''**पर्युपासते**'' पद प्रयुक्त झाले आहे. उत्तम प्रकारे सेवन करण्याचे तात्पर्य हेच आहे की, साधकात किंचित्मात्रही अवगुण राहता कामा नये. जसे, साधकात संपूर्ण प्राण्यांविषयी करुणेचा भाव पूर्णरूपाने जरी नसला तरी त्याचा कोण्या प्राण्याविषयी अकरुणेचा (निर्दयता) भाव मुळीच असता कामा नये. साधकांत ही लक्षणे सांगोपांग नसतात, म्हणूनच त्यांना ह्यांचे सेवन करण्यास सांगितले गेले आहे. सांगोपांग लक्षणे बाणल्यावर

ते सिद्धाच्या कोटीत येतील.

साधकाचे ठिकाणी भगवत्प्राप्तीची तीव्र उत्कंठा आणि व्याकूळता झाल्यास त्याचे अवगुण आपोआप नष्ट होतात. कारण उत्कंठा आणि व्याकूळता अवगुणांना खाऊन टाकतात. तसेच त्याच्याकडून साधनही आपोआपच होऊ लागते. या कारणामुळे त्याला भगवत्प्राप्ती लवकर आणि सुगमतेने होते.

**भक्तास्तेऽतीव मे प्रियाः**—भक्तिमार्गावर चालणाऱ्या भगवदाश्रित साधकासाठी येथे "**भक्ताः**" पद प्रयुक्त झाले आहे.

भगवंतांनी अकराव्या अध्यायाच्या त्रैपन्नाव्या श्लोकात वेदाध्ययन, तप, दान, यज्ञ इत्यादींनी आपल्या दर्शनाची दुर्लभता सांगून चौपन्नाव्या श्लोकात अनन्यभक्तीने आपल्या दर्शनाच्या सुलभतेचे वर्णन केले. त्यानंतर पंच्चावन्नाव्या श्लोकात आपल्या भक्ताच्या लक्षणांच्या रूपाने अनन्य-भक्तीच्या स्वरूपाचे वर्णन केले. यावर अर्जुनाने याच (बाराव्या) अध्यायाच्या पहिल्या श्लोकात हा प्रश्न केला की, सगुण-साकाराचे उपासक आणि निर्गुण-निराकाराचे उपासक यांच्यात श्रेष्ठ कोण ? भगवंतांनी दुसऱ्या श्लोकात या प्रश्नाच्या उत्तरात (सगुण-साकाराची उपासना करणारे) त्या साधकांना श्रेष्ठ सांगितले, जे भगवंताचे ठिकाणी मनाला तल्लीन करून अत्यंत श्रद्धेने त्यांची उपासना करतात. येथे उपसंहारामध्ये त्याच साधकासाठी "**भक्ताः**" पद आले आहे.

त्या साधक भक्तांना भगवान् आपला अत्यंत प्रिय असल्याचे दर्शवित आहेत.

सिद्ध भक्तांना "प्रिय" आणि साधक भक्तांना "अत्यंत प्रिय" म्हणण्याची कारणे अशी आहेत—

(१) सिद्ध भक्तांना तर तत्त्वाचा अनुभव अर्थात् भगवत्प्राप्ती झालीच आहे, परंतु साधक भक्त भगवत्प्राप्ती न होतासुद्धा श्रद्धापूर्वक भगवत्परायण असतात. म्हणून ते भगवंतांना अत्यंत प्रिय असतात.

(२) सिद्ध भक्त भगवंताच्या मोठ्या मुलाप्रमाणे आहेत—**मोरे प्रौढ तनय सम ग्यानी**। परंतु साधक भक्त भगवंताच्या लहान, अबोध बालकाप्रमाणे आहेत—**बालक सुत सम दास अमानी**।

(मानस ३। ४३। ४)

लहान बालक स्वाभाविकच सर्वांना प्रिय वाटत असतो. म्हणून भगवंतांनाही साधक भक्त अत्यंत प्रिय वाटतो.

(३) सिद्ध भक्ताला तर भगवान् आपले प्रत्यक्ष दर्शन देऊन आपल्याला ऋणमुक्त मानतात. परंतु साधक भक्त तर (प्रत्यक्ष दर्शन न होता देखील) सरळ, विश्वासपूर्वक एकमात्र भगवंताचे आश्रित होऊन त्यांची भक्ती करत असतात. म्हणून त्यांना अजून दर्शन न दिल्याबद्धल भगवंत स्वतःला त्यांचे ऋणी मानतात आणि म्हणूनच भगवान् ते आपले अत्यंत प्रिय असल्याचे म्हणतात.

**परिशिष्ट भाव**—कर्तव्याला 'धर्म' म्हणतात. जो धर्मापासून विचलित होत नाही, त्याला 'धर्म्य' म्हणतात. सर्व काही भगवंतच आहेत—यासारखा दुसरा कोणताही सिद्धान्त नाहीच. म्हणून हा 'धर्म्य' आहे (गीता ९। २).

श्रद्धा साधकात असते. सिद्धान्त श्रद्धा नसते तर अनुभव असतो. कारण त्याच्या अनुभवात एका परमात्म्याशिवाय दुसरे काहीही नाहीच, सर्व काही परमात्माच आहे, मग तो श्रद्धा काय म्हणून करेल? साधकाच्या दृष्टीत दुसरी सत्ता राहते, म्हणून तो उपासना करतो (**पर्युपासते**) अर्थात् आपले जीवन तसे बनवितो. परंतु त्याचा भाव असा असतो की, भगवंताशिवाय जर काही असेल तर तीही भगवंताचीच लीला आहे.

दुसऱ्या सत्तेची मान्यता असूनही साधक भगवत्परायण राहतो आणि भगवंताशिवाय दुसरा कोणी त्याचा प्रेमास्पद नसतो, म्हणून तो भगवंताला अत्यंत प्रिय असतो. जोपर्यंत त्याला 'सर्व काही भगवंतच आहेत'—याचा अनुभव येत नाही तोपर्यंत भगवान् त्याचे ऋणी राहतात!

श्रीमद्भागवतात भगवान् म्हणतात—

**यावत् सर्वेषु भूतेषु मद्भावो नोपजायते।**
**तावदेवमुपासीत वाङ्मनःकायवृत्तिभिः॥** (११। २९। १७)

'जोपर्यंत संपूर्ण प्राण्यात माझा भाव अर्थात् 'सर्व काही परमात्माच आहे'—असा वास्तविक भाव होणार नाही, तोपर्यंत अशा प्रकारे मन, वाणी आणि शरीराच्या सर्वच वृत्तींनी (आचरणाने) माझी उपासना करीत रहावे.'

***ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-संवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः॥ १२॥***

**अशा प्रकारे ॐ तत् सत् ह्या भगवन्नामोच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या व योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद् - रूपी श्रीकृष्णार्जुनसंवादात "भक्तियोग" नावाचा बारावा अध्याय पूर्ण झाला॥ १२॥**

या (बाराव्या) अध्यायात अनेक प्रकारच्या साधनांसह भगवद्भक्तीचे वर्णन करून भक्तांची लक्षणे सांगितली गेली आहेत आणि या अध्यायाचा उपक्रम तसेच उपसंहारही भगवद्भक्तीमध्येच झाला आहे. केवळ तीसऱ्या, चौथ्या आणि पांचव्या—तीन श्लोकांत ज्ञानाच्या साधनेचे वर्णन आहे, परंतु तेही भक्ती आणि ज्ञानाची परस्पर तुलना करून भक्तीला श्रेष्ठ दाखविण्यासाठीच आहे. म्हणूनच या अध्यायाचे नाव "भक्तियोग" ठेवले गेले आहे.

## बाराव्या अध्यायाची पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायात "**अथ द्वादशोऽध्यायः**" ची तीन, "**अर्जुन उवाच**" इत्यादी पदांची चार, श्लोकांची दोनशे चव्वेचाळीस आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग दोनशे चौसष्ठ आहे.

(२) "**अथ द्वादशोऽध्यायः**" ची सात, "**अर्जुन उवाच**" इत्यादी पदांची तेरा, श्लोकांची सहाशे चाळीस आणि पुष्पिकेची पंचेचाळीस अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग सातशे पाच आहे. या अध्यायाचे सर्व श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायामध्ये दोन उवाच आहेत. "**अर्जुन उवाच**" आणि "**श्रीभगवानुवाच**"

## बाराव्या अध्यायातील प्रयुक्त छंद

या अध्यायाच्या वीस श्लोकापैकी नवव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "भगण" प्रयुक्त असल्याने "**भ-विपुला**", एकोणीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "नगण" प्रयुक्त असल्याने "**न-विपुला**" आणि वीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "नगण" तसेच तृतीय चरणात "भगण" प्रयुक्त झाल्याने "**संकीर्ण-विपुला**" संज्ञेचे छंद आहेत. बाकीचे सतरा श्लोक ठीक "**पथ्यावक्त्र**" अनुष्टुप् छंदांच्या लक्षणांनी युक्त आहेत.